


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १३ वें ] ऑगस्ट १९६० [ अंक ११



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका








अनुक्रमणिका








प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष तेरावें ऑगस्ट
अंक अकरावा १९६०

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर

प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | धर्मकोश- व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी | ... ... ... | ५२-०-० |
| | कापडी बांधणी | ... ... ... | ६४-०-० |
| (२) | धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी | ... ... ... | ११०-०-० |
| | कापडी बांधणी | ... ... ... | १२६-०-० |
| (३) | धर्मकोश- संस्कारकाण्ड भाग १ ला | .... | ४५-०-० |
| (४) | मीमांसादर्शन | ... ... ... ... | ३०-०-० |
| (५) | मीमांसाकोश ... भाग १ ते ४ | | १३५-०-० |
| (६) | कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | ... ... | ६-०-० |
| (७) | हिंदुधर्माची समीक्षा (लक्ष्मणशास्त्री जोशी) | ... | ५-०-० |
| (८) | वैदिक संस्कृतीचा विकास | ... .. ... | ६-०-० |
| (९) | नवमानवतावाद | ... ... ... ... | २-८-० |
| (१०) | मानवाचा आदर्श | ... ... ... ... | ३-०-० |
| (११) | चार्वाक- इतिहास आणि तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) | ... | ३-०-० |
| (१२) | गीता-प्रवेश (डॉ. गो. त्रि. देवस्थळी) | ... | २-८-० |
| (१३) | छत्रपति संभाजी महाराज (श्री. वा. सी. बेंद्रे) | .... | १६-०-० |



अनुक्रमणिका

## आर्थिक साहाय्याचा प्रश्न

राष्ट्राराष्ट्रांतील आर्थिक साहाय्याचा विचार घेणारां-प्रमाणेंच देणारांच्या दृष्टिकोणांतूनहि होत असतो. या दृष्टीनें या प्रश्नाचा व्यापक भूमिकेवरून ऊहापोह करणारा एक लेख न्यूयॉर्कच्या "डिसेंट" द्वैमासिकाच्या वसंत १९६०च्या अंकांत हेन्री पॅक्तर यांनीं लिहिला आहे. त्याचा थोडक्यांत सारांश येथें देत आहोंत.

रोमन साम्राज्याच्या पडत्या काळांत नागरिकांच्या सामर्थ्यावर साम्राज्याचें रक्षण करणें कठीण झालें. अशावेळीं आजूबाजूच्या अनेक लहानसहान दोस्तांना व राजांना, त्यांनीं तटस्थ राहावें म्हणून आर्थिक मदत वा खंडणी देण्याचा प्रघात सुरूं झाला. या व्यवस्थेमुळें साम्राज्य कित्येक शतकें टिकाव धरून राहिलें. आजची अवस्थाहि कांहीं अंशीं तशीच आहे. मात्र आजच्या राज्यकर्त्याला आपलें धोरण हुषारीचें व योग्य आहे एवढें सांगून चालत नाहीं. तें सद्वर्तनावर आधारलेलें आहे हेंहि सिद्ध करावें लागतें.

दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळांत साहाय्याची आवश्यकता अमेरिकी मतदारापुढें मांडण्यांत आली ती केवळ त्यांतील गुणांच्या आधारावरच नव्हे. आणखी एक दोन मुद्दे त्यांत घातले गेले. एक दयाभाव व दुसरा कम्युनिस्टांना थोपवून धरण्याचा मार्ग. त्यावरील टीकाहि याच्या बरोबर उलट भूमिकेवरून होती. दुष्ट साम्राज्यवाद्यांचें एक साधन वा स्वप्नाळु विश्वबंधुत्ववाद्यांचा भोंगळपणा विरोधकांना त्यांत दिसत होता. साहाय्याचे पुरस्कर्ते "साम्राज्यवाद" हा आक्षेप खोडतांना मदतीमुळें अन्यत्र साध्य होणारे फायदे दाखवील व स्वप्नाळुपणा नाहीं हें साहाय्यामुळें होण्याऱ्या अमेरिकेच्या फायद्यावर बोट ठेवून सिद्ध करील. साम्राज्यशाहीचीं पापें धुवून टाकण्याचा मार्ग म्हणूनहि या साहाय्याचा उल्लेख होई. तथापि भांडवलशाहीपूर्व विचारसरणींत दारिद्र्य हें इतरांच्या कंजूषपणामुळें येतें अशी समजूत असल्याकारणानें या पापक्षालनाच्या उपक्रमामुळें विरोधाचीच वाढ झाली आहे, असें दिसून येतें. पॅलेस्टाइन, भारत, मार्शल योजनेंतील युरोप इत्यादि अशा प्रकारचीं अनेक उदाहरणें नमूद करतां येतील. गरजू वा गरीब राष्ट्रांना दयेच्या जोरावर अंकित करून घेतां येईल किंवा आर्थिक मदत केल्यानें कम्युनिझम थोपवून धरतां येईल ही समजूत भ्रामक आहे असें स्पष्ट झालें आहे. एक काळ असा होता कीं मागस देशांतील चारदोन महत्त्वाचीं माणसें हातांशीं धरून त्यांवर प्रभाव पाडतां येई. आतां तेथील बहुसंख्य जनतेच्या राहाणीचा प्रश्न पुढें आला असून ही जनता श्रीमंतांना लुटण्याच्या कल्पनेच्या सहज आहारी जाऊं शकते असें दिसून आलें आहे. तसेंच परावलंबित्वापेक्षां दारिद्र्य पत्करण्याची अभिमानी वृत्तिहि तिच्याठिकाणीं आहे. तथापि राहणीचें मान हळुहळुच सुधारूं शकतें; व त्या दृष्टीनें आमची मदत जेथें तिचा खरा उपयोग होऊं शकेल त्या सामाजिक थरापर्यंत पोहोंचतच नाहीं असा अनुभव आहे.

आर्थिक साहाय्याच्या बाबतींत अमेरिकेच्या मानानें सोविएटचें धोरण अधिक नियोजित, लवचिक व झटपट घेतल्या जाणाऱ्या निर्णयावर आधारलेलें असतें. उलट एक वर्षापेक्षां अधिक काळासाठीं अध्यक्षांनीं कांहीहि कबूल करतां नये असा कॉंग्रेसचा निश्चित आदेश. सोविएट मदतीचें प्रमाण अमेरिकेपेक्षां कितीतरी कमी. पण त्यांचा प्रचारात्मक उपयोग कितीतरी अधिक. वास्तविक देणगीच्या रूपानें सोविएट सहसा साहाय्य करीतच नाहीं; सारें साहाय्य परतफेडीच्या कर्जरूपानें. त्यामुळें मदत घेणारावर कितीतरी अधिक बंधनें येतात. पण मदतीचें स्वरूप मात्र त्या त्या राष्ट्रांतील जनमानसाचा योग्य अंदाज घेऊनच ठरवलेलें ! सोविएट








कर्जावरील व्याजाचा दर २ टक्के असल्यानें तो कमी वाटतो व प्रचारासाठीं उपयोगीहि ठरतो. पण त्यांच्या अटी अमेरिकेपेक्षाहि कडक आहेत. त्यांच्या-योगानें ऋणको राष्ट्रांचा निर्यात व्यापार रशियन साम्राज्याच्या नियोजनाशीं बांधला जातो. अमेरिका डॉलर्सच्या रूपानें मदत देते व कोणत्याहि परकीय चलनाच्या रूपानें ती परत स्वीकारण्यास तयार असते. सोविएट मदतीचें तसें नाहीं.

उत्पादन व भोगवट्याच्या पातळींतील अंतर नाहीसें करण्याच्या व आंतरराष्ट्रीय हुंडणावळीच्या व्यवहारांत समतोल राखण्याच्या हेतूनें भांडवल, तंत्रविद्या व कुशल कर्मचारी यांच्या पुढारलेल्या राष्ट्रांकडून मागस राष्ट्रांकडे होणारा संघटित प्रवाह म्हणजे आर्थिक साहाय्य. सामुदायिक आर्थिक सुरक्षितता साधण्याचा तो एक मार्ग आहे. सर्व राष्ट्रांत सुरक्षितता व संधि मिळेल अशी जागतिक आर्थिक व्यवस्थेची कल्पना त्यांत अभिप्रेत आहे. हेतूच्या दृष्टीनें पाहिल्यास हें साहाय्य तीन प्रकारचें असूं शकतें; ( १ ) दुष्काळादिसारख्या अरिष्टांतील साहाय्य, ( २ ) एकाद्या राष्ट्रांतील विशिष्ट कार्य वा योजना तडीस नेतां यावी म्हणून मदत; (३) विशिष्ट प्रदेशाचा विकास करण्यासाठीं करण्यांत येणारें सामान्य नियोजन पार पाडण्यासाठीं साहाय्य. आर्थिक साहाय्य हें सरकारी वा बिनसरकारी असूं शकतें. तसेंच एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्राला दिलेले, कोलंबो योजनेसारखे अनेक राष्ट्रांनीं एकमेकांना देण्याचे वा संयुक्तराष्ट्रसंघटनेकरवीं होणारे सार्वराष्ट्रीय असे त्याचे स्वरूपावरून तीन प्रकार करतां येतात.

जागतिक ऐक्याच्या कल्पनेनें भारलेले उदारमतवादी मोठ्या प्रमाणावर साहाय्य देण्याची आवश्यकता प्रतिपादन करतात. या भूमिकेमुळें कित्येकदां मागस राष्ट्रांत अनेक पांढरे हत्ती दिसून येतात. आधुनिक सोयींनीं सुसज्ज इस्पितळ बांधायचें व तें चालवायला डॉक्टर नसायचा; पोलाद कारखाना उभा करायचा व लोखंड, कोळसा वा बाजारपेठ यांचा पत्ताहि नसायचा; उत्तम मोठा राजमार्ग बांधून त्यावरून उंटांच्या गाड्यांतून प्रवास करायचा; धरणें बांधायचीं व भोंवतालची जमीन पिकांच्या दृष्टीनें सर्वस्वीं अयोग्य असायची अशीं एक ना दोन, शेकडों उदाहरणें देतां येतील. तसेंच पूर्वीची साम्राज्यवादाची कल्पना आतां पूर्णतया बदलून गेली आहे. आपलें अतिरिक्त उत्पादन खपवणें, कच्चा माल मिळवणें वा भांडवल किफायतशीरपणें गुंतवणें ही कल्पनाच आतां त्यांत आढळत नाहीं. आमचे ट्रॅक्टर, पोलाद कारखाने, धरणें, तंत्रविद्येचा सल्ला, रणगाडे, शाळा, पाणबुड्या इ. देणगी म्हणून स्वीकारण्याची विनंति करण्यास परकीय येत असतात. नफ्याचा हेतु साम्राज्यशाहींत राहिलेलाच नाहीं; आपल्याच प्रेरणेनें प्रत्यही उग्र होणारा सत्ताकलह तिच्या मुळाशीं आतां आढळतो, हेंहि नमूद करणें जरूर आहे.

साम्राज्यवादाच्या कल्पनेंत आणखीहि एक बदल झाला आहे. देणग्या देणारा हा साम्राज्यवाद लेनीनप्रणित व्याख्येंत मुळीं बसूंच शकत नाहीं. त्या व्याख्यांत काहीं वेळां धर्मप्रसार करण्याच्या मिषानें जाणाऱ्या मिशनऱ्यांच्या मागून तर काहीं वेळां स्वतंत्रपणें बाजारपेठा व किफायतशीर विनिमयाची संधी पाहून खाजगी भांडवल परदेशांत जाई व त्या नंतर राजसत्ता. राज्याचें धोरण आर्थिक हितसंबंधांची जपणूक व जोपासना करणारें असे. आतां उलट परिस्थिति निर्माण झाली आहे. औद्योगिक कंपन्या वा भांडवलदार यांनीं या मागस राष्ट्रांतून भांडवल गुंतवावें म्हणून सरकार त्यांना आर्जवून सांगत आहे. देशांत सहा टक्के नफा मिळवणारे भांडवलदार बाहेर दहा टक्के वा पंधरा टक्के मिळण्याची खात्री असूनहि भांडवल गुंतवण्यास तयार होत नाहींत. सरकारनें हमी देऊन, कर माफ करून व अन्य सवलती दाखवूनहि त्यांचें मन सहसा वळवतां येत नाही. राजकीय हेतु साध्य करण्यासाठीं आर्थिक



अनुक्रमणिका








साहाय्याचा उपयोग करण्याची भाषा आतां बोलली जात आहे; हेंहि आजच्या बदललेल्या परिस्थितीचें एक महत्वाचें लक्षण होय.

## आजचीं मध्यपूर्वेंतील राष्ट्रें :

भारतीय परराष्ट्रीय धोरणामुळें मध्यपूर्वेंतील राष्ट्रांशीं भारताचा बराच निकटचा संबंध आला आहे; व या राष्ट्रांतील घडामोडीविषयीं बरेंच कुतूहलहि निर्माण झालें आहे. या दृष्टीनें या प्रदेशांतील राजकीय पार्श्वभूमीची चर्चा करणारा श्री. बेंजामिन स्वाद्रान् यांचा एक लेख "करंट हिस्ट्री"च्या मे १९६० च्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे. त्याचा हा थोडक्यांत सारांश :

मध्यपूर्वेंत आज तीन महत्वाचे गट आढळतात: अरब राष्ट्रें, अरब नसलेलीं मुसलमान राष्ट्रें व इस्रायल. यापैकीं इस्रायलमध्यें अंतर्गत स्थैर्य निर्माण झालें असून त्यानें आवश्यक संरक्षक संघटनाहि उभारली आहे. कोणत्याहि जागतिक राजकीय गटांत हें राष्ट्र सामील झालेलें नाहीं. परंतु तेथील जनतेचा एकंदरीत दृष्टिकोण विचारांत घेतल्यास पाश्चात्य राष्ट्रांत त्याची गणना करावयास हरकत नाहीं.

तुर्कस्तान व इराण हीं मध्यपूर्वेंतलीं बिन-अरबी मुसलमान राष्ट्रें ! त्यांच्या सीमा सोविएटशीं जोडून असल्यानें त्यांच्यावर सोविएटचें सतत दडपण असणें स्वाभाविक आहे. हीं राष्ट्रें बगदाद करार व "सेंट्रल ट्रीटी ऑर्गनायझेशन"मध्यें सामील झालीं असून या दडपणाचा प्रतिकार करण्याची तयारी त्यांनीं दर्शविली आहे. दोहोंनाहि अमेरिकेचें लष्करी व आर्थिक सहाय्य मिळालें आहे. तुर्कस्थानला मिळालेल्या साहाय्याचें प्रमाण अधिक असून त्याची प्रतिकारशक्तीहि अधिक मोठी आहे. तथापि दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळांत दोहोंच्या प्रतिकारक्षमतेचा प्रत्ययहि आला आहे. इतरांच्या मानानें येथें राजकीय स्थैर्यहि अधिक आहे.

मध्यपूर्वेचा खरा प्रश्न म्हणजे अरब राष्ट्रांचा. येमेनमधील अनियंत्रित सत्ता व नुकतेच उदयास आलेले सौदी अरेबिया हीं दोन उदाहरणें वगळल्यास या राष्ट्रांत स्वराज्याची परंपरा नाहीं. आपलें राज्य चालविण्याचा अधिकार वा जबाबदारी अरबांना शेकडों वर्षांत उपभोगावयास मिळालेली नाहीं. पहिल्या महायुद्धानंतर येथें पाश्चात्यांचा प्रभाव पडूं लागला व दुसऱ्या महायुद्धानंतर हीं राष्ट्रें पूर्णतया स्वतंत्र झालीं खरी; तथापि राज्यकारभार चालविण्याच्या अनुभवाची पार्श्वभूमी मात्र येथें मुळीच नव्हती. सामाजिक अशांति, आर्थिक बदल व पाश्चात्य तंत्रविद्या व विचारप्रणालींचा प्रभाव यांच्या योगानें येथें अनेक गुंतागुंतीचे प्रश्न गेल्या पंधरा वर्षांत निर्माण झाले आहेत. आर्थिक मागासलेपणा व पारतंत्र्य यांच्या जाणीवेमुळें येथील तरुणपिढीस पाश्चात्य साम्राज्यवाद हा साहजिकच सर्वांत मोठा शत्रू वाटूं लागला. मूलतः या राष्ट्रांत तीन प्रकारचे प्रश्न निर्माण झाले आहेत. सामाजिक उत्पात, आर्थिक मागासलेपणा व राजकीय अस्थिरता. दोन महायुद्धें व गेल्या पंधरा वर्षांतील घडामोडी यांच्यामुळें या प्रश्नांना अधिकच उग्र स्वरूप प्राप्त झालें आहे.

या राष्ट्रांच्या कांहीं प्राथमिक अडचणी आहेत. अर्थव्यवस्थेंत शेतीचें महत्त्व अत्यंत मोठें असलें तरी शेतीचे मालकीसंबंध व उत्पादनपद्धति हीं मात्र अत्यंत मागासलेलीं आहेत. औद्योगीकरण या राष्ट्रांना महत्त्वाचें व आवश्यक वाटतें खरें; तथापि येथील प्रत्यक्ष परिस्थितींतूनच तें वाढलें पाहिजे, एकंदर विकासक्रमाशीं तें संकलित झालें पाहिजे व त्यासाठीं विपुल पैसा व तंत्रविद्या यांची गरज आहे याबद्दल मात्र तेथें फारशी जाणीव नाहीं. जुनें जीवन, पाश्चात्य विचार, तेलाचे कारखाने व शैक्षणिक सुधारणा यांच्या प्रभावामुळें कोलमडून पडत आहे. परंतु त्याच्या ऐवजीं सामाजिक परिस्थितीशीं अनुकूल अशा नव्याची उभारणी होत नसल्यानें येथें सामाजिक अरिष्टें निर्माण होत आहेत. बहुसंख्य जनता जागृत होत आहे खरी. पण ती निरक्षर व अडाणी

असल्यानें तिच्या सामर्थ्याला रचनात्मक वळण मिळूं शकत नाहीं. येथील लोकशाहीचा डोलारा हा बाहेरून लादलेला असल्यानें तो कोलमडून पडला आहे. या राष्ट्रांना आपले प्रश्न सोडवण्यासाठीं पुरेशी संधीहि मिळालेली नाहीं. जागतिक आणीबाणीच्या परिस्थितीनें त्यांना घेरलें व इस्रायलच्या निर्मितीमुळें आपल्या आशा-आकांक्षांना धक्का पोहोचला आहे असें त्यांना वाटूं लागलें. अशा परिस्थितींत पाश्चात्य राष्ट्रांनीं त्यांना त्यांच्या मार्गांतील प्राथमिक अडचणींचें स्वरूप समजावून सांगून त्या दूर करण्यासाठीं मदत देऊं करणें योग्य होतें. एकतर अशी मदत त्यांनीं स्वीकारली तरी असती, नाहींतर आपले प्रश्न आपणच सोडवूं अशी भूमिका घेतली असती. तथापि त्या ऐवजीं त्यांच्या प्रश्नांकडें जागतिक कम्युनिझमविरोधी लढ्याच्या दृष्टिकोणांतून पहाण्यांत आलें व या लढ्यांत अरब राष्ट्रांचा पाठिंबा मिळवण्याच्या व लष्करी करारांत त्यांना सामील करून घेण्याच्या प्रयत्नांना सुरवात झाली. साहजिकच या राष्ट्रांतून संशयाचें वातावरण निर्माण झालें.

इराक वि. संयुक्त अरब प्रजासत्ताक, नासेर वि. कासीम इत्यादि अरब राष्ट्रांच्या अंतर्गत कलहांचा विचार आपणांस या पार्श्वभूमींतूनच केला पाहिजे. मुळांत नजीब व नासेरचें बंड ही एक इजिप्तमधील अंतर्गत घटना होती. देशांतील अंतर्गत वातावरण सुधारणें वा आपणाशीं संबंध नसलेल्या घडामोडींपासून अलिप्त राहाणें हा तिचा हेतु होता. परंतु अशा वेळीं पाश्चात्यांनीं प्रादेशिक लष्करी संघटना सुचवली व सोविएट आर्थिक व लष्करी साहाय्य देण्याची भाषा बोलूं लागले. नासेरला एकदम आंतरराष्ट्रीय महत्त्व प्राप्त झालें. त्याची महत्त्वाकांक्षा वाढली. आरंभीचा मर्यादित हेतु सोडून सर्व अरबांचें राजकीय नेतृत्व स्वतःकडे घेण्याची भाषा तो बोलूं लागला. तो सोविएटच्या अधिक जवळ आला व इराक-बगदाद योजनेंत सामील झाला असल्यानें इराकशीं कलह करण्यास त्याला उत्तेजन मिळालें. अशा परिस्थितींत अरब राष्ट्रवादाला वेगळाच अर्थ प्राप्त झाला; त्याचें नवें व व्यापक कार्य सुरूं झालें.

अरब राष्ट्रांत स्थैर्य निर्माण करून अरबी जनतेंत आत्मविश्वास व सामर्थ्य उत्पन्न करण्याचें व आपल्या सुप्त शक्तींचा आविष्कार व विकास करण्याची तिला संधी देण्याचें साधन म्हणून अरब राष्ट्रवाद अनेकांना मान्य होताच. प्रश्न काय तो त्यानें उपयोगांत आणावयाच्या साधनांचाच. व नासेर व कासीम यांचा मतभेद झाला. कासीमचें म्हणणें असें कीं, "सामान्य अरब माणसावर माझीहि श्रद्धा आहे. पण त्याच्या ठिकाणीं प्रथम प्रादेशिक अभिमान निर्माण झाला पाहिजे; कारण अरबसमाज हा राजकीय व भौगोलिक दृष्टीनें लहान लहान राज्यांत विभागला गेला आहे. विविध टोळ्या, धर्मपंथ व परस्पर विरोधी स्थानिक गट यांत विभागल्या गेलेल्या इराकी जनतेला इराकी राष्ट्र म्हणून प्रथम एकत्र आणणें हा आमच्यापुढें खरा पहिला प्रश्न आहे. प्रथम स्थिर व जबाबदार नागरीक जीवन निर्माण झालें पाहिजे. त्यानंतर व्यापक ऐक्याचा विचार करतां येईल. प्रत्येक अरबाच्या मनांत आपण अरब समाजाचा एक घटक आहोंत ही भावना असेलहि. पण ती एक अमूर्त, कल्पनारम्य, प्रसंगविशेषीं चेतवता येण्यासारखी भावना आहे इतकेंच! दैनंदिन जबाबदारी पार पाडण्याचें सामर्थ्य तिच्यायोगानें निर्माण होऊं शकत नाहीं. ऐक्याची भावना खालून जोपासना करून वाढवली पाहिजे, वरून लादतां कामा नये. लादावयाची म्हटल्यास तिच्यांतून अराजक, जुलूम व हुकूमशाही हीं निर्माण झाल्यावांचून राहाणार नाहींत."

उलट, नासेरची भूमिका अशी कीं, अरब राष्ट्रवादाचीं उद्दिष्टें शक्य तों लवकर साध्य करण्यासाठीं, जरूर पडल्यास सत्तेच्या बळावर देखील, तो वरून लादला पाहिजे. कासीमच्या म्हणण्यानुसार वागल्यास

कितीतरी कालावधी लागेल आणि अरब जनतेनें वा आपण इतका काळ थांबणें इष्ट नाहीं. कासीमची सामान्य अरब माणूस स्थानिक अभिमान अंगीं बाणूं शकतो अशी समजूत आहे ती खरी नाहीं. व या स्थानिक अभिमानावर विश्वासहि ठेवतां येत नाहीं. व्यापक अरब ऐक्य हें लादलेंच पाहिजे.

पाश्चात्यांचे मध्यपूर्वेतील हितसंबंध व हेतु पुढील-प्रमाणें सांगतां येतील : जागतिक विरोधाच्या दृष्टीनें बोलायचें म्हणजे हा प्रदेश तीन खंडांना जोडणारा महत्त्वाचा प्रदेश आहे. कम्युनिस्टांचा प्रसार येथें पूर्णतया थांबवतां आला नाहीं तरी या प्रदेशाचा 'बफर' म्हणून उपयोग होऊं शकतो. पश्चिम युरोपला येथून तेलाचा पुरवठा होतो. तेलाच्या उत्पादनकार्यांत भांडवल गुंतविण्यास येथें वाव आहे. येथें सामाजिक व आर्थिक विकास व्हावा यासाठीं राजकीय शांतता प्रस्थापित होणें जरूर आहे. हीं उद्दिष्टें स्पष्ट असलीं तरी त्याबाबत यशस्वी धोरण मात्र अजून आखलें गेलें नाहीं.

सोविएट उद्दिष्टांविषयीं बोलायचें झाल्यास तीं यांच्या नेमकीं उलट आहेत असें म्हणतां येईल. सोविएटला लागून हा प्रदेश असल्यानें शक्य तों पाश्चात्यांचीं धोरणें पराभूत करून संभाव्य लष्करी धोका टाळणें हें पहिलें उद्दिष्ट; नंतर हीं राष्ट्रें पाश्चात्यावर अवलंबून राहूं नयेत यासाठीं लष्करी तांत्रिक, व आर्थिक साहाय्य पाश्चात्यांकडून त्यांनीं घेऊं नये असा प्रयत्न करणें; या प्रदेशांत हळुहळू शिरकाव करून घेऊन तो कम्युनिझमखालीं आणणें; यासाठीं आवश्यक झाल्यास अंतर्गत अराजकहि निर्माण करण्यास हरकत नाहीं. व हीं उद्दिष्टें साधण्यासाठीं त्यांनीं योग्य धोरणहि आखलें आहे.

आणि या दोन्ही गटांच्या धोरणांच्या यशापयशाचें उत्तम गमक म्हणून अलीकडचें इराकचें उदाहरण देतां येईल.

---

श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी

# सुधीन्द्रनाथ दत्त

नामवन्त बंगाली कवि, पंडित, पत्रकार व तत्त्वज्ञ सुधीन्द्रनाथ दत्त यांच्या आकस्मिक निधनाने बंगाली साहित्यकारांच्या जगांत दुःखाची छाया पसरली आहे. दिनांक २५ जून १९६० रोजी पहाटेस मेंदूंतील रक्तस्रावाने सुधीन्द्रदत्तांना देवाज्ञा झाली. त्याच दिवशीं संध्याकाळीं कलकत्ता आकाशवाणीने आणि इंग्लिश व बंगाली वृत्तपत्रांच्या विशेष अंकांनी ही शोकवार्ता प्रसृत केली. वयाला ६० वें वर्ष चार महिन्यांनी लागावयाचें होतें. प्रकृति सुदृढ होती. निरंतर प्रसन्न मनाचे होते. म्हणून त्यांच्या निधनाच्या वार्तेवर प्रथम कोणाचाच विश्वास बसला नाहीं.

यांचें जीवन भौतिक व मानसिक अशा दोन्ही बाजूंनी सुसंबद्ध होतें. जन्मकालींच अनेक भाग्यदेवतांनी मंगलाशीर्वाद सुधीन्द्रदत्तांना दिला असावा. सूक्ष्म बुद्धि, विशाल मन, निरंतर अतृप्त रहाणारी जिज्ञासा, निरोगी व सुंदर देह, सुसंस्कृत, शुची व श्रीमंत कुलांत जन्म, या गोष्टी हेंच सुचवितात. कलकत्ता येथील प्रमुख सॉलिसिटर हिरेन्द्रनाथदत्त हे यांचे वडिल होत. हिरेन्द्रनाथदत्त प्रख्यात संस्कृत पंडितहि होते. सुधीन्द्र यांचे चुलते म्हणजे प्रसिद्ध बंगाली नट अमरेन्द्रनाथ दत्त हे होत; यांनी एका सबंध जमान्यांत बंगाली नाट्यमंच गाजविला होता. १९०१ आक्टोबर ३० दिनांकीं सुधीन्द्रनाथदत्त यांचा जन्म झाला. माध्यमिक शिक्षण बनारस येथील 'ॲनी बेझंट' विद्यालयांत झालें. कलकत्याच्या स्कॉटिश चर्च कॉलेजमध्यें त्यांनीं उच्च शिक्षण घेऊन १९२२ सालीं ते बी. ए. झाले.

शिक्षणाच्या वयांत त्यांच्यावर बंगालमधील नवजीवनाच्या विविध आन्दोलनांचे संस्कार झाले. त्यांतल्यात्यांत त्यांच्यावर मुख्य प्रभाव कविश्रेष्ठ रवीन्द्रनाथ ठाकूर यांच्या प्रतिभासंपन्न साहित्य कृतींचा पडला. त्यावेळीं रवीन्द्रनाथांची प्रतिभा नव्या नव्या उन्मेषांनीं भारतीय व विशेषतः बंगाली मनाला चकित करून रंजवीत होती. त्यावेळीं रवीन्द्रनाथ बंगाली संस्कृतीला काव्य, गद्यलेखन, संगीत आणि चित्रकला इत्यादि विविध अंगांना नवें वळण देऊन सुंदर रूप देत होते. समान मनांचें आकर्षण क्षणांत घडून येतें तसें झालें. रवीन्द्रनाथ ठाकूर यांनी १९२९ सालीं जपान आणि अमेरिका या देशांच्या विजयी यात्रा केल्या त्यावेळीं सुधीन्द्रनाथ यांना बरोबर घेतलें होतें. त्यानंतर सुधीन्द्रनाथ हे साहित्य विषयक ज्ञान वाढविण्याकरितां यूरोपमध्यें राहिले. त्यांनी अनेक युरोपियन भाषांचें व त्यांतील साहित्याचें अध्ययन केलें. निरंतर विद्याव्यासंग व कलेची आराधना यामुळें सुधीन्द्रदत्तांच्या ज्ञानाचा व्यास वाढत गेला आणि व्यक्तिमत्व विशाल बनलें.

अंदाजें असें म्हणतां येईल कीं, त्यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वास १९३० सालीं प्रारंभ झाला. त्याचवेळीं त्यांनी 'परिचय' हें त्रैमासिक सुरू केलें. हें त्रैमासिक सुरू होण्याअगोदर १९२६ मध्यें 'परिचय' नामक साहित्यिकांचें एक मित्रमंडळ कलकत्ता येथील प्रतिष्ठित गृहस्थ सर धीरेन्द्रमित्र यांच्या आश्रयाखालीं सुधीनदत्तांनीं स्थापन केलें होतें. त्यांत हिन्दी व युरोपियन असे दोन्ही प्रकारचे लोक सभासद म्हणून सामील झाले होते. 'स्टेटस्मन' पत्राचे एक संपादक माल्कम् मुगेरिज् हेहि या मित्रमंडळाच्या कार्यास साहाय्य करीत असत. त्यापुढील दहा वर्षांत सुधीन्दत्तांच्या प्रतिभेचें वैशिष्ट्य बंगाली साहित्यिकांत मान्यतेस पावत गेलें; सुधीन्दत्तांच्या कविता अगदी वेगळें स्वरूप घेऊन रसिकांच्या मनाला वश करूं लागल्या व विवशपणें चोखंदळ साहित्यिकांना परामर्ष घेण्यास भाग पाडूं लागल्या. या कवितांचा संग्रह सहा भागांमध्यें क्रमानें प्रसिद्ध झाला. युरोपियन कवितांचाहि त्यांनी वेळोवेळीं बंगालींत अनुवाद केला. तो त्यांनीं 'प्रतिध्वनि' या नांवानें प्रसिद्ध केला. त्यांच्या निबन्धाचे दोन संग्रह प्रसिद्ध झाले आहेत. कवि व विचारवंत








# सुधीन्द्रनाथ दत्त

या दोन्हीहि नात्यांनी बंगाली साहित्यांत चिरस्मरणीय असें कार्य ते करून गेले आहेत. तरुण पिढीच्या ओठावर त्यांच्या कवितांच्या ओळी आणि समर्पक शब्दावली सध्यां खेळतांना दिसतात. आधुनिक पाश्चात्य संस्कृतीचें द्वंद्वत बंगाली मनाला भिडविण्याचें कार्य प्रथम सुधीन्द्रनाथ दत्तांनीच केलें, असेंहि त्यांचे अनेक चहाते सांगतात. आधुनिक बंगाली कवितेंत उच्चतम मानाचें स्थान आपल्या छोटेखानी कवितासंग्रहांच्या योगानें सुधीन्द्रनाथदत्तांनीं मिळविलें आहे. शिस्त व संयम यांचा नितांतप्रेमाशीं संगम झालेला यांच्या कवितेंत मिळतो. बुद्धि आणि अंतःकरण किंवा संप्रदायवाद आणि अद्‌भुतरम्यतावाद किंवा सुभगपदलालित्य आणि दैनंदिन व्यवहारांतील वाक्प्रयोग यांच्यातील विरोध नाहीसा झालेला सुधींद्रदत्तांच्या कवितेंत सांपडतो. बंगाली सुप्रसिद्ध कवि समरसेन यांनी सुधींद्रांबद्दल असें लिहिलें आहे कीं, " उत्स्फूर्त लेखनामध्यें नीटनेटकेपणा वा सुसंबद्धता संभाळली जाणें कठीण असतें, असें म्हणतात; परंतु सुधीन्द्रदत्तांनी आपल्या कृतींनी हें मत बाधित ठरविलें आहे. सुधीन दत्तांच्या कवितेंत पूर्वपरंपरा आणि आधुनिकता, तर्क व उत्कट भावना यांचा सुरेख मिलाफ झालेला मिळतो; सामान्य भाषेंतील वाक्प्रचार प्रतिष्ठित शैलीशीं एकरूप झालेले दिसतात. विशेषतः बंगाली वाङ्मयांत जी गोष्ट दुर्लभ आहे ती गोष्ट म्हणजे बुद्धिनिष्ठा होय. सुधीनदत्तांच्या प्रतिभेंत तत्त्वदर्शनाला अढळ स्थान असल्यामुळेंच ही गोष्ट घडूं शकली."

सुधीन्द्रनाथदत्त हे रवींन्द्रनाथ ठाकुरांच्या परंपरेतले असूनहि वेगळेपणा दाखवूं शकले याचा परिणाम सुधींद्रनाथ दत्तानंतरच्या कविवृंदावर झाल्याशिवाय राहिला नाहीं. इंग्लिश साहित्यांतहि नांवाजलेली अशी कविता सुधीन्द्रनाथदत्तांनी लिहिलेली आहे. इंग्लंड व अमेरिकेमधील अनेक नियतकालिकांनी सुधीन्द्रनाथदत्तांच्या कवीतेला आदराने प्रसिद्धि दिली आहे. इंग्लिश भाषेवरीलहि त्यांच्या प्रभुत्वाला मान्यता मिळाली आहे, असें यावरून म्हणतां येतें. रवीन्द्रनाथ ठाकूर यांच्या शतसांवत्सरी–जयंती निमित्ताने भारत सरकारने महत्त्वाचा कार्यक्रम आखला आहे. त्यावेळी सुधीनदत्त यांनी ' रवीन्द्रनाथ ठाकूर यांचें रसग्रहण ' म्हणून लिहिलेला निबंध प्रसिद्ध होणार आहे. तो निबंध त्यांनीं नुकताच लिहून पुरा केला आहे.

वृत्तपत्रकार म्हणूनहि सुधीन्द्रदत्ताचें स्थान महत्त्वाचें होतें. कलकत्ता येथील ' स्टेटस्मन ' पत्राचे सहायक संपादक म्हणून पुष्कळ वर्षें त्यांनीं काम केलें. इ. स. १९४९ सालीं संपादकपदाचा त्याग करून त्यांनीं ' दामोदर व्हॅली कार्पोरेशन ' वार्ताधिकारी हें पद स्वीकारलें. दामोदर दरी धरण बरेचसें पुरें झाल्यावर हेंहि पद त्यांनी सोडून दिलें. अखेरीस इ. स. १९५६ सालीं जादवपूर विद्यापीठांत तुलनात्मक साहित्यविद्या या खात्याचे ते प्रमुख झाले. इ. स. १९५७–५८ सालीं शिकॅगो विद्यापीठाने त्यांना निमंत्रित प्राध्यापक म्हणून नेमलें होतें. जादवपूर विद्यापीठाचे उच्चशाखेचे विद्यार्थी त्यांच्या व्याख्यानांचें श्रवण करण्याकरितां नित्य उत्सुक असत. मोजून, मापून, तोलून व तपासून विषय तयार करावयाचा आणि नन्तर आपल्या प्रतिभासंपन्न समीक्षणानें सजवून मांडावयाचा अशी त्यांची पद्धति होती. ते अप्रतिम वाद्कुशलहि होते. तर्काच्या शास्त्राची सूक्ष्मता व भेदकता त्यांनी अभ्यासिली होती; त्यामुळें मार्क्सवादाचा सखोल अभ्यासकरूनहि त्याची मोहिनी त्यांच्यावर पडूं शकली नाहीं. मार्क्सचा द्वंद्वात्मक विकासवाद व ऐतिहासिक भौतिकवाद यांची त्यांनी उत्कृष्ट छाननी केली होती. ते स्वतः मार्क्सवादी नव्हते परंतु मार्क्सवादाचा विवेचकपणें एकेकाळीं अंगीकार केलेले सुप्रसिद्ध क्रांतिकारक मानवेन्द्रनाथरॉय हे त्यांचे परममित्र बनले याचें कारण कसलाच सांप्रदायिक आग्रह सुधीन्द्रदत्तांना बाधला नव्हता.

सुधीन्द्रदत्तांच्या जीवनांतली निष्ठा त्यांच्या उदार मानव्यांत प्रकट होत असे. मित्रसंपदा त्यांनी अपार संपादिली होती. इ. स. १९२६ पासून अखेरपर्यंत त्यांना विविधक्षेत्रांत परिचित झालेले अगणित मित्र लाभले. स्वतःच्या विचारांवरील निष्ठा न सोडतां अन्य विविध निष्ठा असलेले अनेक मित्र त्यांच्या संगतिकरितां लोभावलेले होते. मानवेन्द्रनाथरॉय आपल्या अखेरच्या पर्वात सुधीन्द्रदत्तांचे जिवश्चकण्ठश्च स्नेही बनले याचें कारण सुधीन्द्रदत्तांची विशाल बुद्धिमत्ता, उदार अंतःकरण, आदरातिथ्य इत्यादि गुण होत. सार्वजनिक सभा सम्मेलनामध्यें पुढें येऊन भाग घेणें त्यांना आवडत नसे; परंतु क्वचित्








प्रसंगी तीहि गोष्ट त्यांना टाळतां आली नाहीं. मानवेन्द्रनाथ रॉय यांच्या दुखवट्याच्या सभेचे ते अध्यक्ष झाले होते त्या प्रसंगीं त्यांचे जे उद्‌गार बाहेर पडले त्यांत त्यांची गाढमैत्रीची भावना व्यक्त झाली. ते म्हणाले, "रॉय यांच्या मृत्यूमुळें माझ्या जीवनांतील कांहीं एक महत्त्वाचा अंश निघून गेला आहे. आतां त्याची कशानेहि भरपाई होणार नाहीं. तो अत्यानंद मी कायमचा गमावला आहे."

सुधीन्द्रनाथदत्त यांना पारलौकिक जीवनाबद्दल व सृष्टीच्या सहेतुकतेबद्दल जबर शंका होती. अनंत विश्वांत माणसाचें भवितव्य काय याला कांहीं महत्त्व नाहीं; विश्वाच्या दृष्टीने हें जीवन उपेक्षणीयच आहे; असें त्यांना वाटत असल्यामुळें येथील अल्पकालीन वस्तींत मैत्री आणि कला हेंच सारसर्वस्व म्हणून मानण्यासारखें आहे, अशी त्यांची श्रद्धा होती. यालाच मानव्यावरील श्रद्धा म्हणतात. सुधीन्द्रनाथदत्त हे एक थोर मानवतावादी कवि होते. बंगाली साहित्य त्यांचें निरंतर ऋणी बनलें आहे.

---

श्री. बाळाचार्य खुपेरकर

# महार्थमञ्जरी परिचय

१. अखिल भारतवर्षामध्यें " नाथसांप्रदाय " म्हणून ज्याची प्रसिद्धि आहे; त्या नाथ-सांप्रदायाचा मूळ सूत्रग्रंथ म्हणजे परम माहेश्वर जो वसुगुप्त यानें प्रकाशांत आणलेलीं " शिवसूत्रें " हा होय. हीं सूत्रें एकंदर सत्त्याहात्तर असून तीं उन्मेषसंज्ञक तीन विभागामध्यें संगृहीत केलीं आहेत. या सूत्रांवर अनेक काश्मीरी पंडितानीं वार्तिकें- भाष्य वगैरे सारखे विवरणात्मक ग्रंथ लिहिले असून पुढें उत्पलाचार्य, सोमानंद इत्यादि शैवपंडितानीं या सांप्रदायाचा आचार व विचार संकलित असा एकत्र उपलब्ध होण्यासाठीं ईश्वर प्रत्यभिज्ञा, शैवदृष्टि वगैरे सारखे ग्रंथहि निर्माण केले आहेत. उत्पलाचार्यांचे प्रशिष्य अभिनवगुप्ताचार्य यानीं तर या शिवसूत्रांच्या आधारावर एवढी प्रचंड ग्रंथरचना केली आहे कीं, त्यायोगें या सूत्रामध्यें प्रतिपादन केलेल्या तत्त्वज्ञानाला " शाम्भवाद्वैत दर्शन " अशी एक स्वतंत्र संज्ञाच प्राप्त झाली आहे. अद्वैत, विशिष्टाद्वैत, द्वैत किंवा शुद्धाद्वैत हे जसे तत्त्वज्ञानाच्या प्रदेशांमध्यें चार प्रकारें आज सर्वत्र प्रसिद्ध आहेत. तसेच नाथसांप्रदायिकानीं आपल्या अमूप ग्रंथसंपत्तिद्वारा मूळ शिवसूत्रांनीं प्रतिपादिलेल्या तत्त्वज्ञानाला एका स्वतंत्रदर्शनाची योग्यता प्राप्त करून दिली. तें हें " शाम्भवाद्वयदर्शन " शिष्यप्रशिष्यद्वारा सारखें प्रचलित होऊन पुढें आपल्या महाराष्ट्रदेशांत वारकरी सांप्रदायाचा मूळ पाया ज्यांनीं घातला आणि आपल्या अद्वितीय व अनुपम अशा ज्ञानेश्वरी–अमृतानुभव चांगदेव पासष्टी या ग्रंथांनीं ज्या दर्शनाचा सर्वत्र विकास केला. त्या दर्शनाचा सांगोपांग विचार करणारा " महार्थमंजरी " नांवाचा जो ग्रंथ, त्या ग्रंथाचा आज आम्ही येथें थोडा परिचय करून देणार आहों.

२. महाप्रकाशशिष्य गोरक्षनाथ, ज्यांचें सांप्रदायिक नांव महेश्वरानंद म्हणून प्रसिद्ध आहे, त्यांनीं " महार्थमंजरी " नांवाचा एक ग्रंथ महाराष्ट्रीय प्राकृत भाषेमध्यें रचून स्वतःच त्यांनीं या महार्थमंजरी ग्रंथावर " परिमल " नांवाचें एक विस्तृत असें भाष्य संस्कृत भाषेमध्यें लिहिलें आहे. मूळ महार्थमंजरी हा ग्रंथ प्राकृत महाराष्ट्रीभाषेमध्यें लिहिला असून त्याच्या एकंदर गाथा सत्तर आहेत. आणि शेवटीं एकाहत्तराव्या शार्दूल-विक्रीडित श्लोकानें या मंजरीची समाप्ति केली आहे. या महार्थमंजरी व परिमलनामक भाष्य यांचा कर्ता महाप्रकाशशिष्य गोरक्ष या नांवाचा आहे. या गोरक्षाचेंच महेश्वरानंद हें नांव सांप्रदायप्राप्त असें गुरूनीं दिलें आहे. " गोरक्षो लोकधिया देशिकदृष्ट्या महेश्वरानंदः । उन्मीलयामि परिमलमन्तर्ग्राह्यं महार्थमञ्जर्याम् ॥ गुरुसांप्रदायदृष्ट्या माझें नांव महेश्वरानंद असून लोकव्यवहाराच्या दृष्टीनें मला गोरक्ष असें म्हणतात. तो गोरक्ष मी, या महार्थमंजरींतील अत्यंत गूढ असलेला असा हा परिमल म्हणजे सुगंध सर्वजनांना आस्वादण्यासाठीं बाहेर प्रगट करीत आहे. असें प्रस्तुत ग्रंथकारानेंच आपल्या लौकिक व सांप्रदायिक नांवाचें निरूपण केलें आहे. या नाथसांप्रदायामध्यें साक्षात् शंकराचे अवतार म्हणून प्रसिद्धीला पावलेल्या महान् पंडित अभिनवगुप्ताचार्यांच्या सर्वंगामी बुद्धिमत्तेचें अनुकरण केल्यामुळें, मंजरीकाराचेंहि लोकोत्तर विद्याविचक्षणत्व या ग्रंथामध्यें प्रगट झाल्याचें दिसून येतें. हा मञ्जरीकार साहित्यशास्त्रामध्यें व प्रत्यभिज्ञादर्शनामध्यें अभिनवगुप्तनाथ यांच्या कृतीचें मी परिशीलन केल्यामुळेंच मला ही निपुणता प्राप्त झाली असें स्वतःच सांगत आहे.

या मंजरीकार गोरक्षाचा जीवनकाल कोणता असावा हें ठरविणें फार दुर्घट आहे. यांचा काल जरी ठरवितां आला नाहीं, तथापि या ग्रंथकारानें व याच्या गुरूनें चोलदेशांत कांहीं दिवस वास्तव्य केलें होतें असें परिमलभाष्याच्या शेवटीं दिलेल्या पुढील श्लोकावरून दिसून येतें :








"अथ कालक्रमवशाच्चोळदेशशिरोमणिः ।
महाप्रकाशो नामासीद्‌देशिकोद्दक् क्रियोत्तरः ।
तस्य शिष्योऽभवद् धीमान् गोरक्षो नामवश्यवाक् ।
महेश्वरानन्द इति प्राप्तपूज्याह्वयो महान् ।।

महाप्रकाश या नांवाचे आचार व विचार यामध्यें श्रेष्ठ असे एक सद्‌गुरु चोळ देशांमध्यें कालक्रमानें महत्त्वाला पावलेले असे होऊन गेले. त्यांचा शिष्य गोरक्ष या नांवाचा बुद्धिमान व वश्यवाणी असा एक विद्वान् होऊन गेला. ज्याला महेश्वरानंद असें मोठें पूज्य नांव प्राप्त झालें होतें, या गोरक्षानें स्वतः रचलेले असे एकंदर दहा[1] ग्रंथ असून ज्यांतील वचनें या परिमलामध्यें प्रसंगाप्रसंगानें त्यानें उद्धृत केलीं आहेत. एकंदर परिमलभाष्यासह या महार्थमंजरी ग्रंथाचें स्वरूपवर्णन स्वतः ग्रंथकारानेंच परिमलभाष्याचे शेवटीं उपसंहारामध्यें एका श्लोकानें नमूद केलें आहे तो श्लोक असा—

गाथानामनुभाषणं तदनुतच्छाया ततो व्याकृतिः
ग्रंथार्थग्रथनक्रियासु गहनो हृद्यश्च कश्चित् क्रमः ।
संवादोक्तिसहस्रसंकलनया तत्त्वार्थ चर्चोत्सवः
सौभाग्यं च विमर्शसंपद् इति प्रस्थानमध्यक्ष्यताम् ।।

या महार्थमंजरी ग्रंथामध्यें प्रथम गाथांचा अनुवाद करून नंतर त्याची संस्कृत भाषेमध्यें छाया दिली आहे. पुढें या ग्रंथामध्यें निरूपिलेल्या विषयांचा व्याकार म्हणजे विस्तारानें विवेचन केलें आहे. तें विवेचन करतांना स्वीकारलेला जो क्रम आहे तो वाचकांना अत्यंत आकर्षक होईल अशीच योजना केली आहे. मध्यंतरीं ठिकठिकाणीं निरूपण केलेल्या विषयाचा परिपोष होण्यासाठीं हजारों संवादीवचनांचा संग्रह केला असून त्यायोगानें तत्त्वार्थ चर्चेला एकप्रकारचें मनोरंजक स्वरूप आलें आहे. आणि विचाराची संपत्ति उत्कर्षाला पावलेली दिसून येत आहे. तात्पर्य, अशा तऱ्हेचें हें शांभवाद्वयप्रस्थान या ठिकाणीं या ग्रंथाचे द्वारां आम्ही प्रतिपादिलें आहे. तें वाचकानीं नीट ध्यानीं घ्यावें. स्वतः ग्रंथकारानेंच आपल्या ग्रंथाचें स्वरूप याप्रमाणें वर्णन केलें असल्याचें पाहिल्यानंतर एकंदर सत्तर गाथांतून प्रतिपाद्य विषयाचें निरूपण चढत्या क्रमानें कसकसें केलें आहे. हेंहि परिमलाच्या आधारानेंच येथें आम्ही दाखविणार आहों.

३. पहिल्या गाथेमध्यें मंगलाचरण केलें असून प्रतिपाद्य विषयाच्या आरंभींचें वाक्य उद्धृत केलें आहे. दुसऱ्या गाथेमध्यें या शांभवाद्वैतदर्शनांतील प्रतिपाद्य वस्तूचा निर्देश केला आहे. नंतर पुढील तीन गाथामध्यें परमात्मतत्त्वाच्या निरूपणाचे कामीं कोणत्याहि प्रत्यक्षादि प्रमाणांचा उपयोग कसा होत नाहीं, याचें विवेचन सविस्तर केलें आहे. सहाव्या गाथेमध्यें या दर्शनामध्यें ज्या तत्त्वाचें निरूपण केलें आहे. त्या तत्त्वाचें ज्ञान होण्यास अधिकारी पुरुष साधनचतुष्टय-संपन्नच असावा वगैरे जें इतरत्र अधिकारी पुरुषाचें वर्णन केलें आहे, त्याचें सर्वतोपरी निरसन करून आपल्या या दर्शनामध्यें अधिकारी विभागाची कांहीं जरूरी नाहीं हें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. सातव्या गाथेमध्यें विधिनिषेधाची छाननी केली आहे. आठव्या गाथेमध्यें संसाराच्या स्वरूपाचें वर्णन केलें आहे. नवव्या गाथेमध्यें परमात्मा हा सर्वांच्या अनुभवांत स्पष्टपणें उतरणारा असूनहि तो अनुभवविषय कसा होत नाहीं याचें विवेचन आहे. दहाव्या गाथेमध्यें परमात्म्याचें अनुभवविषय होणें किंवा न होणें हे दोनहि परस्परविरुद्ध प्रकार त्याचे ठिकाणीं कसे संभवतात ? असा आक्षेप घेऊन त्याचे निरसनार्थ परमात्म्याचे ठिकाणीं लोकविलक्षण असें एक विशेषप्रकारचें स्वातंत्र्य आहे हें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. यापुढील दोन गाथांतून याच विमर्शसंज्ञक विचाराचें सविस्तर विवेचन असून तेंच पुरुषार्थसाधक कसें आहे हें दाखविलें आहे. नंतर पुढें तेराव्या गाथेमध्यें या विचारालाच दृढ करण्यासाठीं या दर्शनामध्यें स्वीकारलेल्या छत्तीस तत्त्वांचें परस्पर वैलक्षण्य दाखवून नंतर सृष्टिक्रमाला तें अनुसरून कसें आहे हें वर्णिलें आहे. यापुढें सत्ताविसाव्या गाथेमध्यें सर्व सृष्टीचा प्रकाश आणि विमर्श या दोन अंशामध्यें कसा अंतर्भाव होतो या विषयींचें स्पष्टीकरण केलें आहे. या स्पष्टीकरणानंतर अठ्ठाविसाव्या गाथेमध्यें एक परमात्म वस्तूमध्यें शिव आणि शक्ति हे दोन विभाग कसे होतात याचा निर्णय केला

१. हे दहा ग्रंथ असे :— १. महार्थमंजरी. २. परिमल. ३. पादुकोदय. ४. संविदुल्लास. ५. कोमलवल्लीस्तवः. ६. परास्तोत्र. ७. सूक्त. ८. महार्थोदय. ९. कुंडलाभरण. १०. मुकुंद केलि. या दहा ग्रंथांपैकीं आज उपलब्ध असे पहिले दोनच आहेत.

आहे. एकोणतिसाव्या गाथेमध्यें परमात्म्याच्याच शक्तीच्या उत्कर्षाचें, विश्वाचें शरीर या नात्यानें विवेचन केलें असल्याचें दिसून येतें. तिसावी गाथा ही विश्वांतील सर्व वैचित्र्य परमात्म्याचे ठिकाणींच कसें साकल्यानें स्थित असतें हें दाखविण्याचे कामीं खर्ची पडली आहे. एकतिसाव्या गाथेमध्यें प्रमाण, प्रमेय, प्रमाता हें त्रिकूट पर्यवसानीं अद्वैतामध्येंच कसें परिणत होतें याचा विचार केला आहे. नंतरच्या दोन गाथेंमध्यें अमूक सत्य आणि अमूक असत्य असा जो अन्य मायावादी आचार्यांनीं विपर्यास मांडलेला होता त्याचें खंडण केलें आहे. त्या पुढील दोन गाथांमध्यें परमात्म्याच्या पूजेचें वैशिष्ट्य कसें आहे या गोष्टीचें स्पष्टीकरण आहे. यानंतरच्या सहा गाथांमध्यें सृष्ट्यादि पंचक्रियांचा मोठ्या गौरवानें कसा विचार करावा याचें वर्णन आहे. यापुढें बेचाळीस ते शेचाळीस अखेर गाथांतून विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण परमात्म्याच्या पूजेचें स्वरूप कसें असावें याचें निरूपण करून सत्तेचाळीस व अठ्ठेचाळीस या दोन गाथांचे द्वारा वास्तविक देवता ही कशी असावी, कोणाला देवता म्हणावें या गोष्टींचें सोदाहरण आणि सोपपत्तिक विवेचन केलें आहे. या विवेचनाचा निष्कर्ष असा निष्पन्न झाला कीं, जीवात्मा तोच परमात्मा. करतां त्याचीच पूजा करावी. या परमात्मस्वरूप जीवात्म्याखेरीज अन्य कोणतीहि दुसरी देवता नाहीं कीं जी आपले सर्व मनोरथ पूजादि उपचार तिला अर्पण केल्यानें ती संतुष्ट होऊन पुरे करील. आत्मस्वरूपाहून अन्य देवताच वास्तविकपणें जर कोणी नाहीं तर तिच्या पूजा-अर्चेला मंत्रतंत्राची काय आवश्यकता आहे असा एक स्वाभाविक प्रश्न येथें विचारवंताच्या अंतःकरणामध्यें उत्पन्न होतो. त्या प्रश्नाचें उत्तर देण्यासाठीं एकोणपन्नासावी गाथा येथें प्रवृत्त झाली आहे. या गाथेमध्यें पूजा-अर्चा वगैरेच्या वेळीं ज्या मंत्रांचा विनियोग केला जातो, त्या मंत्रांचें तत्त्व किंवा रहस्य काय आहे याचा विचार "मंत्र" या शब्दाच्या निरुक्तीनें ग्रंथकारानीं येथें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. स्वतःच्या म्हणजे आत्मतत्त्वाच्या ज्ञानमय स्वरूपाला मंत्र असें म्हणतात. केवळ विशिष्टप्रकारची अक्षरानुपूर्वी असली म्हणजे त्याला मंत्र म्हणण्याचा जो प्रघात पडला आहे तो औपचारिक आहे. वैखरीवाणीनें उच्चारल्या जाणाऱ्या अक्षरानुपूर्वीला मंत्र म्हणणें वा समजणें हें मिथ्या ज्ञानाचें द्योतक आहे. याविषयीं प्राचीन अभियुक्तांचें असें एक वचन आहे कीं :

"उच्चार्यमाणा ये मंत्रा न मन्त्रांश्चापि तान् विदुः ।
मोहिता देवगन्धर्वा मिथ्याज्ञानेन गर्विताः ॥ १ ॥"

वाणीनें उच्चारिले जाणारे हे खरोखरीचे मंत्रच नव्हेत. देव, गंधर्व कां असेनात ते सर्व आम्ही मिथ्याज्ञानानें भारलेले भ्रांत असेंच म्हणतों.

अशा रीतीनें मंत्राचा व्युत्पत्तिसिद्ध अर्थ विचारांत घेतला असतां सर्वत्र व्यवहारांत वाणीनें उच्चारल्या जाणाऱ्या मंत्रव्यवस्थेची वाट काय? असा प्रश्न उत्पन्न झाला असतां त्याचें उत्तर देण्यासाठीं पन्नासावी गाथा ग्रंथकारांना याठिकाणीं लिहावी लागली. या गाथेमध्यें वाक्तत्त्वाचें वास्तविक स्वरूप काय आहे, हें ग्रंथकारांनीं येथें फार चांगल्या रीतीनें दाखवून दिलें आहे. मंत्राचा उल्लेख आल्याबरोबर ज्याचें स्मरण अवश्य होईल अशा मुद्रांचें निरूपण एकावन्नाव्या गाथेमध्यें झालें आहे. बावन्नाव्या गाथेमध्यें विमर्शशक्ति ही ऐहिक व पारलौकिक भोग व मोक्ष याचा लाभ करून देणारी आहे यांचें निरूपण झालें आहे. त्रेपन्नावी गाथा जीवन्मुक्ताची अवस्था सोपपत्तिक आहे, हें दाखवीत आहे. बौद्धांच्या क्षणभंगवादाचा निरास करण्याचे कामीं चौपन्नावी गाथा चांगलें विवेचन करते. आत्मस्वरूपाच्या आनंदस्फुरणाचें निरूपण पंचावन्नाव्या गाथेमध्यें झालें आहे. पुढें छप्पन ते एकोणसाठ गाथांच्या द्वारा या दर्शनांतील तत्त्वज्ञान कोणत्या उपायानें प्राप्त होईल याचा उपदेश केला आहे. साठ ते पासष्ट या गाथा या नाथदर्शनांतील विमर्शतत्त्वाचा ज्यांनीं अवलंब केला त्यांना निश्चितता कशी प्राप्त होते याचें निरूपण चांगल्या रीतीनें करतात. हें आत्म्याच्या विमर्शाचें तत्त्व तत्काल सिद्धि कशी करून देतें याचें निरूपण सासष्टाव्या गाथेमध्यें आहे. सदुसष्टावी गाथा या विमर्शतत्त्वाचा लाभ गुरुकृपेनें प्राप्त होतो याचें निवेदन करते. अडुसष्टावी गाथा हें विमर्शतत्वच सर्वदर्शनसाराचें साधन आहे हें सांगते. एकोणसत्तराव्या गाथेमध्यें या दर्शनांतील तत्त्वविस्ताराचा थोडक्यांत संग्रह केला आहे. आतांपर्यंतच्या एकोणसत्तर गाथांतून आम्ही ज्या दर्शनाची सर्व प्रक्रिया सिद्ध करून वर्णिली त्या सर्वश्रेष्ठ दार्शनिक तत्त्वालाच शरण जाणें व्यासादिकांनाहि भाग पडलें हें सत्तराव्या गाथेमध्यें दाखवून दिलें



अनुक्रमणिका






आहे. व्यासमहर्षींनीं अठरा पुराणें लिहिलीं. भारत रचिलें, श्रीमद्भागवतग्रंथ लिहून भगवद्गुणगान केलें. सर्व उपनिषदांचें सार अशी भगवद्गीता संपादिली. पण या सर्व ग्रंथांतून या शैवदर्शनांतील अत्युच्च सिद्धांतांचाच अवलंब व्यासमहर्षींना करावा लागला. व्यासानीं सुद्धां ज्या तत्त्वाचा अवलंब केला अशा या सर्वोत्तम तत्त्वांचा स्वप्नामध्यें येऊन ज्या योगिनीनें आपणांस उपदेश केला त्या योगिनीला शार्दूलविक्रीडित वृत्तांतील पद्याची रचना करून नमस्कार केला आणि या ग्रंथाची समाप्ति केली.

४. महार्थमंजरी हा ग्रंथ शिवसूत्रांमध्यें ग्रथित केलेल्या तत्त्वज्ञानाचें निरूपण करणारा असल्यानें, यामध्यें परमसिद्धांत म्हणून "अद्वैततत्त्वच" सिद्ध करून दाखविण्याचा प्रयत्न सर्वत्र दिसून येतो. मूळ सत्तर गाथा आणि त्यावरील परिमलनामक भाष्य अशा स्वरूपाचा हा ग्रंथ वादग्रंथ असल्यानें प्रथम मूळ गाथेचा पद पदार्थ सांगितल्यानंतर अन्यमतीयांचा पूर्वपक्षरूपानें अनुवाद करून त्याचें खंडण उदाहरणांसह सप्रमाण परिमलामध्यें केलें असल्याचें या ग्रंथामध्यें दिसून येतें. मागील परिच्छेदामध्यें आम्ही या ग्रंथांतील सत्तर गाथांमध्यें निरूपिलेल्या विषयांची अनुक्रमणिका क्रमानें दाखविलीच आहे. आतां या परिच्छेदामध्यें फक्त या ग्रंथांत निरूपिलेल्या शैवदर्शनांतील सिद्धांतच आम्ही संक्षेपानें येथें सांगणार आहों. "सदेव सौम्यदमग्रे आसीत्" या श्रुतिवचनामध्यें वर्णिल्याप्रमाणें सर्वत्र दृष्टिगोचर होणाऱ्या अनंत भेदानीं व्याप्त अशा विश्वोत्पत्तीच्या पूर्वी सत्स्वरूपी परमात्मा एकाकीच अखंड असा भरून राहिला होता. या परमात्म्याच्या एकाकी स्थितीलाच अनुलक्षून तो स्वसंवेद्य आहे. तो वाङ्मनसातीत आहे. तो व्यापक आहे. तो निष्क्रिय आहे. तो निरवयव आहे. तो निर्धर्मक आहे. तो निरंश आहे तो अविनाशी, शुद्धबुद्ध, मुक्त व अविक्रिय आहे. असें वर्णन सर्वत्र वेदामध्यें जसें उपलब्ध होतें. तसेंच येथेंहि केलें असून नंतर त्या परमात्म्यानें स्वेच्छेनें आपली एकाकी स्थिति टाकून देऊन ज्या वेळीं अनेकरूपें धारण केलीं. त्यावेळीं त्याला वेदप्रतिपाद्य म्हणूं लागले. त्याचे ठिकाणीं सगुणता व सधर्मकताहि निर्माण झाली. तो सक्रिय झाला. व परिच्छिन्नताहि त्याचे ठिकाणीं प्राप्त झाली. तो जसा "महतो महीयान्" आहे तसाच "अणोरपि अणीयान्" असा होऊं शकतो असें त्याचेविषयीं वेदानें वर्णन केलें आहे. परमात्म्याची निष्क्रियता जशी स्वाभाविक आहे. त्याप्रमाणें त्याची सक्रियताहि स्वाभाविकच आहे. तो सगुण वा निर्गुण दोनहि रूपें स्वेच्छेनेंच धारण करतो. ही एक त्याची सहज लीलाच आहे. निर्गुणावस्थेमध्यें परमात्म्याचे ठिकाणीं जशी सच्चिदानंदात्मकता असते. त्याचप्रमाणें सगुण स्थितीमध्यें सुद्धां तीच सच्चिदानंदात्मकता अविनाशी, नित्य अशी असते. तो जसा निराकार आहे तसाच साकारहि आहे. तो जसा द्रष्टा आहे तसा दृश्यहि आहे. तोच भोक्ता व तोच भोग्य. दोनहि रूपें तोच धारण करतो. गुरुहि तोच व शिष्यहि तोच. सर्व स्थिरचर सृष्टीला व्यापून तोच जगदात्मा सर्वत्र भरून राहिला आहे. "सर्वं खलु इदं ब्रह्म" किंवा "सर्वं विष्णुमयं जगत्" या वचनानीं याच परमात्म्याचें वर्णन वेदामध्यें केलेलें आढळून येतें. ज्यावेळीं परमात्मा जगद्रूपानें विनटतो त्यावेळीं त्यास विश्वात्मक परमात्मा असें म्हणतात. आणि ज्यावेळीं तो या सर्व विश्वाचा उपसंहार करून आत्माराम स्थितींत मग्न होऊन राहतो त्यावेळीं त्यास विश्वोत्तीर्ण परमात्मा असें म्हणतात. परमात्म्याच्या या दोनहि अवस्था परमात्मा स्वेच्छेनें धारण करीत असल्यानें यांतील एक अवस्था सत्य व दुसरी अवस्था मिथ्या असें म्हणण्याचें कारण नाहीं. माझाच विस्तार म्हणजे हें जगत् असा या दर्शनांतील परमात्मतत्त्वासंबंधीं सिद्धान्त आहे.

५. एकमेवाद्वितीय व सर्वव्यापक असा चैतन्य स्वरूप परमात्मा ज्यावेळीं आपल्या व्यापक रूपाचें तिरोधान करतो, त्यावेळींच जीवजडात्मक अशा या सर्व विश्वाची निर्मिति होते. वास्तविक चैतन्यशून्य असा एकहि पदार्थ या विश्वामध्यें नाहीं. सर्वत्र चैतन्य हें भरून राहिलें असल्यानें जड असा पदार्थ एकहि या विश्वामध्यें नाहीं. पण ज्या पदार्थांतील चैतन्य स्थूल दृष्टीला अनुभव गोचर होत नाहीं, त्या पदार्थांस आम्ही जड अशी संज्ञा देतों. ज्यांतील चैतन्य व्यक्तपणें प्रत्ययाला येतें त्यांस चेतन जीव असें म्हणतों. हें जीवजडात्मक विश्व व्यापक परमात्म्याच्या अपेक्षेनें मर्यादित असें आहे. या मर्यादित विश्वाचें ज्ञानहि आम्हास मर्यादित रूपानेंच होत असल्यानें तें बंधाला कारण होतें. वास्तविक हें विश्वांतील अनंत पदार्थांचें











अनुक्रमणिका

होणारें ज्ञान, त्या सर्वव्यापक चैतन्यमय प्रभूचेंच असल्यानें " ज्ञानादेव तु कैवल्यम् " या न्यायानें मोक्षदायक असावयास पाहिजे. सर्व विश्व हा मूळ चैतन्याचाच विलास असल्यानें विश्वाच्या ज्ञानास ब्रह्मचैतन्याखेरीज हें अन्यज्ञान आहे असें म्हणतां येणार नाहीं. तथापि विश्वाचें होणारें हें ज्ञान ब्रह्मचैतन्याप्रमाणें व्यापकस्वरूपानें होत नसल्यानें तें मोक्षदायक होत नाहीं. विश्व हें जरी ब्रह्मस्वरूप आहे, तरी तें मर्यादित असल्यानें त्याच्या होणाऱ्या ज्ञानाला एकप्रकारानें व्यापकपणा येत नसून तें भिन्नभिन्नपणानें येत असल्यानें संकुचित झाल्यासारखें वाटतें. हा ज्ञानाचा संकुचितपणाच व्यापक ब्रह्मज्ञानाला " अज्ञान " ही संज्ञा देण्यास कारण झाला आहे. या शैवदर्शनामध्यें विश्वाचें जें ज्ञान होतें, तें अज्ञानस्वरूपी असल्यानें " ज्ञानादेव तु कैवल्यम् " या न्यायाला विषय होऊं शकत नाहीं. सर्व विश्वाचें ज्ञान हें विश्वरूपानें न होता तें ज्यावेळीं परमात्मरूपानें होईल त्याच वेळीं तें कैवल्याला कारण होईल. "सर्वं विष्णुमयं जगत् " "सर्वं खलु इदं ब्रह्म" असा ज्यावेळीं आपल्या ज्ञानाला अंतर्मुखत्वानें आकार येईल त्याचवेळीं तें ज्ञान मोक्षजनक होतें. विश्वाचें ज्ञान ज्यावेळीं बहिर्मुखत्वानें होतें म्हणजे विश्वांतील भिन्न भिन्न जें जल, तरु, पाषाण, पर्वत यांच्या रूपानें होतें त्यावेळीं परमात्मज्ञानाचा तिरोभाव झालेला असतो. विश्व हें जरी परमात्मरूप असलें तरी तें परमात्मरूप आहे असें प्रत्यभिज्ञान झाल्याखेरीज तें मोक्षजनक होणार नाहीं. विश्वाचें विश्वरूपानें झालेलें हें ज्ञान परमात्मस्वरूप नसल्यानेंच याला अज्ञान असें शैवदर्शनकार म्हणूं लागले. इतकें मात्र या ठिकाणीं सावधपणें ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं, हें अज्ञान म्हणजे ज्ञानाचा अभाव नव्हे. येथील नञाचा अर्थ अभाव नसून अल्प असा आहे. विश्वाचें ज्ञान हें ज्ञान परमात्मज्ञानच खरें, पण तें व्यापक स्वरूपानें नसून परिच्छिन्न स्वरूपानें असल्यानें तें परमात्म्याचें संपूर्ण ज्ञान नव्हे. त्या ज्ञानाला परिच्छिन्नपणा म्हणजे मर्यादितपणा आल्यानें तें ज्ञान अपूर्ण झालें. अपूर्णज्ञान हें अल्पज्ञानच होय. म्हणून त्यास अज्ञान असें शैवानीं नांव दिलें आहे. शैवांची ही परिभाषा चित्तांत वागवूनच जेथें जेथें त्यांनीं अज्ञान शब्दाचा उपयोग केला आहे. तेथें तेथें अल्प ज्ञान या अर्थानेंच तो पहावयास पाहिजे. शंकराचार्यांच्या मायावादी तत्त्वज्ञानांतील सदसद्विलक्षण भावरूप जें अज्ञान तें हें नव्हे. " चैतन्यमात्मा, ज्ञानं बन्धः, आत्मा चित्तम् " हीं शिवसूत्रें दृष्टीपुढें ठेवूनच महार्थमंजरीकारानीं परमात्मा, जीव व जड यासंबंधींचें आपलें सर्व विवेचन केलें आहे. तें सर्व संकलित स्वरूपानेंच आम्ही येथें आपल्या पुढें मांडीत आहों. जगत् ( चेतनाचेतन स्वरूप ) आणि जगदीश्वर यांच्या विषयींची शैव वा नाथ सांप्रदायिकांची विचारसरणी कशी आहे हें आपण पाहिल्यानंतर इतर या नाथ सांप्रदायिक सिद्धांताचे परिपोष करणारे किरकोळ विचार मंजरीकारानीं कसे सजविले आहेत हें विवेचन केल्यानंतर हा परिचयात्मक लेख आम्ही पुरा करणार आहों.

६. या शैवतत्त्वज्ञानामध्यें " संवित् " म्हणजे ज्ञान, त्या ज्ञानाखेरीज अन्य असा जगतामध्यें कोणताहि पदार्थ नाहीं. सर्व जागतिक पदार्थांना संवित्तत्त्वानें अंतर्बाह्य व्यापून टाकलें आहे. ज्या वेळीं संवित् ही सामान्यरूपानें प्रकाशमान असते; त्यावेळीं जगतांतील अनंत पदार्थांचें भिन्नभिन्नपणानें ज्ञान होत नाहीं. पण तीच संवित् ज्यावेळीं स्वेच्छेनें विशेषरूप धारण करते त्यावेळींच पृथ्वी किंवा पृथ्वीधर इत्यादि अनेक पदार्थ भिन्नत्वानें प्रतीत होऊं लागतात. पृथ्वी आदि पदार्थांना संवितनें जर अंतर्बाह्य व्यापलें नसतें तर त्यांचें ज्ञानच आपणांस झालें नसतें. अशी ही संवित् स्वयंप्रकाश आहे. या संवितने व्यापलेला पदार्थ संविन्मयच असल्यानें तो मायावादी तत्त्ववेत्त्यांच्या मतप्रणालींत ज्ञेयपदार्थ जड जसा मानला जातो तसा हा संविन्मय झालेला पदार्थ ज्ञेय जरी झाला तरी तो जड आहे असें म्हणतां येत नाहीं. जो जो पदार्थ पाहिला जातो तो तो पदार्थ पाहण्याची जी क्रिया तिनें व्यापल्याशिवाय दृश्य ही संज्ञाच पावत नाहीं. पाहाण्याची क्रिया पहाणाऱ्याहून अन्य निराळी अशी बिलकूल नाहीं. तेव्हा पाहणारा म्हणजेच द्रष्टा – हाच दृश्य होय. अशा प्रक्रियेनें द्रष्टा आणि दृश्य यांच्यामध्यें ऐक्य झाल्यानें द्रष्टा हाच सर्व दृश्य जगताचें रूप धारण करतो हें सहजच सिद्ध झालें. तात्पर्य, द्रष्टृरूप आत्म्याचें ज्ञान झाल्यानंतर तद्भिन्न असें जाणावयाचें कांहींहि रहात नाहीं. तेंव्हा आत्मभिन्न पदार्थच कोणी नसल्यानें आत्मज्ञान झाल्यानंतर पंचमहाभूतात्मक सृष्टीचें ज्ञान अद्याप करून घ्यावयाचें राहिलें आहे असा










प्रश्नच येथें शिल्लक रहात नाहीं. ज्योतिष्टोमयाग, चातुर्मास्ययाग, वगैरे सारख्या यागांचें अनुष्ठान केलें असतां स्वर्गादिक निरनिराळीं फळेंअनुष्ठान कर्त्या पुरुषास प्राप्त होतात. अशी ज्याची कर्ता आणि कर्म यांचेंसंबंधीं भिन्नबुद्धि असते तेथें या कर्माचा हा अधिकारी, या कर्माचा हा अधिकारी. हीं ब्राह्मणानें आचरण करावयाचीं कर्मै, हीं क्षत्रियांना विहित अशीं कर्मै, असा हा अधिकारी विभाग करावा लागतो. पण जेथें कर्ता आणि कर्म यांचेमध्यें द्रष्टा आणि दृश्य यांचेमध्यें जसा भेद नाहीं तसाच भेद नाहीं असा सिद्धांत आहे; तेथें अमूक कर्म अमूक अधिकाऱ्याकरितां, अमूक कर्माचा अमूक अधिकारी असे निरनिराळे अधिकारी सांगण्याचा विचारच उत्पन्न होत नाहीं. यामुळें या शैवदर्शनामध्यें "साधनचतुष्टयाचा ऊहापोह नाहीं. आणि त्या साधनचतुष्टयानें संपन्न असलेला जो प्रमाता तोच या तत्त्वज्ञानाचा अधिकारी हाहि विचार येथें नाहीं. कदाचित् कोणी येथें असें म्हणेल कीं, ऐहिक वा पारत्रिक भोगाविषयींचें वैराग्य म्हणजेच मोक्ष, अशा मोक्षाचें संपादन हेंच आत्मतत्त्वाच्या विमर्शाचें मुख्य प्रयोजन असल्यानें "मुमुक्षुत्व" अंगीं असणें हें तरी अधिकारी पुरुषाचें लक्षण मान्य करणें प्राप्त आहे. तर त्यास शैवतत्त्वज्ञानी असें उत्तर देतात कीं, द्रष्टा, कर्ता, भोक्ता, ज्ञाता असा आत्मा हाच जर दृश्यादि पदार्थांचीं रूपें धारण करतो तर मग दृश्य म्हणून कोणताहि पदार्थ द्रष्टृरूप आत्म्याहून अन्य नसल्यानें सदासर्वकाळ बुद्ध, मुक्त व आनंदरूप आत्म्याला बंधच कोणाचा नाहीं. अर्थात् बंध जर नाहीं तर मुक्त होण्याची गोष्ट मग कशाला विचारांत घ्यावयास पाहिजे. अशा रीतीनें "मुमुक्षुत्व" हें मोक्षाधिकारी पुरुषाचे ठिकाणीं लक्षण असणें जरूरीचें आहे हा विचारच उडून गेला. एका अभियुक्ताचें वचन असें आहे कीं :

" वस्तुस्थित्यां न बन्धोऽस्ति तदभावान्नमुक्तता।
विकल्पघटितावेतावुभावपि न किञ्चन ॥ "

—वास्तविकपणें बंधच नाहीं मग मोक्ष कोठला. आणि त्याची इच्छा म्हणजे मुमुक्षुत्व हें तरी कोठलें. एवंच बंधमोक्षादिव्यवस्था नसल्यानें अधिकारी इत्यादि भेद या तत्त्वज्ञानामध्यें जसे मानले नाहींत. त्याप्रमाणें प्रमाणप्रमेयादि भेदाचीहि कल्पना या दर्शनाला मान्य नाहीं.

प्रमाणप्रमेयाच्या योजनेसंबंधीं शैवाचार्यांचें म्हणणें असें कीं, प्रकाशस्वरूप असा हा आत्माच सर्व जागतिक व्यवहाराला कारण होत असतो. "मला हें दिसतें, किंवा मी हें पाहतों अशा वाक्यांतून पाहणारा जो मी, त्या प्रमातृस्वरूप अशा माझ्या प्रकाशानेंच व्यापल्यामुळें जगांतील स्तंभकुंभादि पदार्थांना ज्ञेय म्हणून ओळखतां येतें. आत्मप्रकाशाचा या स्तंभादि बाह्यपदार्थांशीं जर संबंध न घडेल तर स्तंभ, कुंभ इत्यादि पदार्थांचें परस्पर भिन्नपणानें ज्ञान न होतां सर्वत्रच संकट होऊन एकच एक गोंधळ चहूकडे माजून राहिला असता. निरनिराळ्या पदार्थांपासून होणारीं कार्यें कोणालाच कांहीं करतां आलीं नसतीं. प्रत्येक पदार्थातील वैलक्षण्य दाखविण्यास कांहींच साधन नसल्यानें सर्व जागतिक व्यवहारच कुंठित झाला असता. शिवाय दुसरें असें कीं, प्रकाशमय आत्म्याच्या साहाय्याची जर स्तंभादि पदार्थांना स्वतःचें ज्ञान करून देण्याचे कामीं कांहीं गरज नाहीं. ते आपलें ज्ञान स्वतःचें स्वतःच करून देत आहेत. असें मत स्वीकारलें तर सर्वच प्रमात्यांना सर्व विश्वांतील पदार्थांचें सर्व प्रकारचें ज्ञान सर्वकालीं सारखें होत राहून ते सर्व प्रमाते सर्वज्ञ तरी होतील. किंवा अत्यंत अज्ञ तरी होतील. कारण त्या प्रमात्यांना विश्वांतील अनेक पदार्थांचें ज्ञान व्हावें किंवा न व्हावें या गोष्टीला नियामकच कोणी राहिला नाहीं. कदाचित् ते सर्वज्ञ तरी गणले जातील किंवा अत्यंत अज्ञ तरी गणले जातील. पण हे दोनहि प्रकार व्यवहारबाह्य असल्यानें, जगांतील सुसूत्र चाललेला भेदव्यवहार आत्मप्रकाशानेंच चालला आहे असें समजण्याखेरीज अन्य उपाय नाहीं. तात्पर्य— "यस्य भासा सर्वमिदं विभाति" या श्रुति वचनाला अनुसरून ज्या आत्म्याच्या प्रकाशानें सर्व जगत् प्रकाशित होतें. ज्याचा आधार घेतल्यानें प्रमाणांना प्रामाण्य प्राप्त होतें, त्या आत्म्याचें ज्ञान प्रमाणानें करूं जाणें म्हणजे सूर्याला काडवातीनें प्रकाशित करण्यासारखेंच आहे. तेव्हां आत्मज्ञान हें बाह्य कोणत्याहि प्रमाणानें प्रमित होत नसून तें स्वसंवेद्य असेंच आहे. स्वसंवेद्य असा हा आत्मा ज्यावेळीं स्वेच्छेनें विश्वरूप धारण करतो, त्यावेळीं विश्व हें सुद्धां आत्म्यानेंच धारण केलेलें त्याचें स्वतःचेंच रूप असल्यानें त्या विश्वाच्या ज्ञानाला कोणतेंहि प्रमाण कोणाहि पंडिताला किंवा कोणाहि








पामराला उपकारक होतें असें मानण्याचें कारण नाहीं, गंगेच्या शीतल प्रवाहांत निमग्न झालेल्यास ज्याप्रमाणें तहानेची बाधा कधीहि होत नाहीं. त्याप्रमाणें प्रमाणराज अशा आत्मप्रकाशाशीं ऐक्य पावलेल्या या विश्वाच्या ज्ञानासाठीं कोणालाहि अन्य प्रमाण वस्तूची अपेक्षा बाळगण्याची गरज वाटत नाहीं. किंवा अन्य प्रमाणांचा आत्म्याचें ज्ञान होण्याचे कामीं कांहीं उपयोग होत नाहीं. " प्रमातृतास्पदे तत्र प्रमाणं नोपयुज्यते " हेंच म्हणणें याठिकाणी आम्हांस खरें वाटतें. " विज्ञातारमरे केन विजानीयात् " या उपनिषद्वचनावर आधारूनच येथील प्रमाणविचार शैवाचार्यांनीं केलेला आहे. हें चाणाक्ष वाचकांना येथें सहज समजून येण्यासारखें आहे.

६. जगत्, जगदीश्वर, बंध, मोक्ष, मोक्षाधिकारी, प्रमाण, प्रमेय इत्यादि विषयासंबंधीं शैवाचार्यांनीं केलेल्या विचाराचें सामान्यस्वरूप या महार्थमंजरीमध्यें कसें विवेचिलें आहे याचें दिग्दर्शन केल्यानंतर इतर अध्यासवादी शांकरमतानुयायांचें खंडणहि सविस्तर असें या ग्रंथामध्यें केल असल्याचें दिसून येतें. पण निबंधाची मर्यादा ध्यानीं घेऊन त्याचें निरूपण येथें आम्हास आवरतें घ्यावयास पाहिजे. एवढें मात्र येथें आम्हास सुचविणें अत्यावश्यक वाटतें कीं, अध्यासवादी जनानीं या विश्वाच्या निर्मिती संबंधीं प्रतिबिंबवाद, आभासवाद, अवच्छेदवाद, मायावाद, अजातवाद वगैरे सारख्या ज्या कल्पना केल्या आहेत. त्या सर्व कल्पनांचें सोपपत्तिक व सप्रमाण खंडन या महार्थमंजरीच्या परिमलनामक भाष्यामध्यें श्री गोरक्षनाथ यानीं केलें असून शैव वा नाथ सांप्रदायाच्या चिद्विलासवादाची घटना सोपपत्तिक व वैदिकवचनांच्या आधारें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. अभ्यासकानीं या औदिव्य शैवागमाचा शिवसूत्रांपासून पुढें निर्माण झालेल्या या तत्त्वज्ञानांतील अनेक ग्रंथांचा अभ्यास करणें जरी अशक्य झालें तरी या एका महार्थमंजरी ग्रंथाचा परिमलासह अभ्यास करावा आणि या महाराष्ट्रांत लुप्त होत चाललेल्या तत्त्वज्ञानाला उजाळा द्यावा अशी विनंती करून हा माझा परिचयलेख मी येथें पुरा करतों.

---





अनुक्रमणिका








श्री. पन्नालाल सुराणा

# नव्या महाराष्ट्राचें राजकारण

नव्या महाराष्ट्राच्या राजकारणाची चर्चा सध्यां सर्वत्र चालू आहे. विशेषतः मराठा जमातीचें संभाव्य वर्चस्व इतर जमातींना व एकंदर समाजाला कितपत हानिकारक ठरेल याबद्दल अनेक शंकाकुशंका प्रदर्शित केल्या जात आहेत. प्रा. अ. भि. शहा यांनीं नवभारताच्या मे १९६० च्या अंकांतील आपल्या लेखांत या प्रश्नाची चर्चा एका विशिष्ट दृष्टिकोनांतून केली आहे. तो लेख वाचून मनांत आलेले विचार येथें मांडण्याचा इरादा आहे. नवभारताच्या जुलै ६० च्या अंकांत याच विषयावर श्री. चिकित्सक यांचा लेख आलेला आहे. त्या लेखाची भाषा जरी नको इतकी तिखट असली तरी त्यांत उपस्थित केलेले मुद्दे चिंतनीय आहेत. त्यांतील एक दोन मुद्यांबाबत खाली आवश्यक त्या ठिकाणीं माझीं मतें मी मांडलीं आहेत.

## विकृतिवरच लक्ष नको

आपली लोकशाही नवी आहे व लोकशाहीला विरोधक अशा शक्ती भारतीय व म्हणून महाराष्ट्रीय समाजांत पूर्वीपासून रुजलेल्या आहेत. त्यांची शक्ति परत वाढेल की काय, व त्यापासून येथील लोकशाहीला गंभीर धोका निर्माण होईल काय असें वाटण्यासारखी आजची परिस्थिति आहे. पण आजच्या राजकारणांत विकृति निर्माण करणाऱ्या या शक्तीच फक्त महत्त्वाच्या आहेत असें मानणेंहि चूक होईल. एकोणिसाव्या शतकांत लोकशाहीनिष्ठ राजकारणाला सुरवात झाली. राजकीय विचारप्रणालि, दृष्टिकोन व कार्यक्रम यांवर आधारलेल्या राजकीय चळवळी सुरूं झाल्या व त्यांतून हळूहळू राजकीय पक्षांच्या संघटना निर्माण झाल्या.

महाराष्ट्रांतहि राजकारणाला या पक्षांच्या कार्यक्रमांचें व चळवळींचेंच स्वरूप आलें. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर सत्तासंपादन हें राजकारणाचें एक उद्दिष्ट झालें असलें तरी सत्तेसाठीं देखील मुख्यतः राजकीय कार्यक्रमाच्या आधारावरच आपल्या पक्षाला जनमताचें पाठबळ मिळविण्याचे प्रयत्न येथे झाले.

राजकारणाबाबत अशी राजकीय भूमिका नेहमीच पाहिजे तितकी शुद्ध राहिली असें म्हणतां येणार नाहीं. अनेक कारणांमुळें या विशुद्ध राजकारणांत विकृति निर्माण झाल्या. पण म्हणून राजकारणाचा विचार करतांना फक्त विकृतींवरच लक्ष केंद्रित करणें योग्य होणार नाहीं. येथें जातीयतेचा– विशेषतः ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाचा राजकारणावर अनिष्ट परिणाम झाला आहे. सत्यशोधक चळवळीनें हा वाद राजकारणांत आणला, तरी १९३० नंतर भारतीय स्वातंत्र्याची चळवळ फोंफावत गेली तसतसा बहुजनसमाज कॉंग्रेसमध्ये मोठ्या प्रमाणावर येत गेला व ब्राह्मणब्राह्मणेतर-वादाचा प्रभाव कमी झाला. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर संसदीय लोकशाही व निवडणुकींचें राजकारण यामुळें त्या वादाचें पुनरुज्जीवन झाल्यासारखें वाटतें आहे. अर्थात आतां ब्राह्मणद्वेषासारख्या पराभूत भूमिकेऐवजी मराठा वर्चस्वाच्या आक्रमक भूमिकेचा उद्रेक जाणवतो आहे. पण ही एक विकृति आहे. सबंध राजकीय जीवनांत विष कालवणारी विकृति आहे, हें खरें असलें तरी मुळांत राजकारणाचें राजकीय स्वरूप अजिबात नष्ट झालें आहे असें मानणें चूक ठरेल.

## भारतीय पार्श्वभूमि

महाराष्ट्रांतल्या राजकीय शक्ति या बहुतेक सगळ्या भारतीय राजकारणांतल्या विभिन्न शक्तींच्या शाखास्वरूप आहेत. म्हणून भारतीय राजकारणाचें स्वरूप कसें आहे व नजिकच्या भविष्य काळांत कसें राहील हें प्रथम जाणून घेतलें पाहिजे. भारतीय राजकारणांत कॉंग्रेस हा महत्त्वाचा राजकीय पक्ष आहे. राष्ट्रवाद, लोकशाही व समाजवादी समाजरचना या तत्त्वांवर या पक्षाची तात्त्विक बैठक आधारलेली आहे. कॉंग्रेसला प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे ती राष्ट्रवाद व लोकशाही यांच्या प्रस्थापनेसाठीं त्यानें साठ वर्षें केलेल्या चळवळीमुळें. अर्थात् आज त्याला जनमनांत मिळणारा पाठिंबा हा कांहीं या तत्त्वांच्या– विशेषतः समाजवादाच्या,









अनुक्रमणिका

आकर्षणामुळें मिळतो आहे असें नव्हे तर यामागील पुण्याईच्या जोरावरच हा पक्ष आज बहुतेक सर्व राज्यांत सत्तेवर आरूढ झालेला आहे. आणि पर्यायी विरोधी पक्ष बलवान नसल्यानें आणखी दहापंधरा वर्षें तरी तो पक्ष सत्तारूढच राहील असें दिसतें.

सत्तेवर राहण्यामुळें या पक्षाला जहाल घोषणा देतां आल्या तरी त्या कार्यान्वित मात्र करता येणार नाहीत. आणि तो सत्तेवर असल्यामुळें व असण्याची शक्यता असल्यामुळें समाजांतील धनवंत, प्रतिष्ठित व जातीच्या संख्येच्या दृष्टीने बहुसंख्य वर्ग कॉंग्रेसमध्यें घुसला आहे व तो तेथें कायम राहील. राजस्थानमध्यें जाट, मद्रासेंत नाडर, केरळांत येळवा, बिहारांत राजपूत यांचा प्रभाव कॉंग्रेसमध्ये वाढतो आहे. तेव्हां महाराष्ट्रांतील कॉंग्रेसमध्ये मराठा जमातीचा वाढता प्रभाव ही कांही अपवादात्मक गोष्ट नाहीं.

कॉंग्रेसचें धोरण अखिल भारतीय पातळीवर त्या मानानें नेमस्त राहील. त्यामुळें त्याच्याविरुद्ध दोन प्रकारच्या राजकीय शक्ति संघटित होत जातील. कॉंग्रेसचा समाजवाद देशाला गोत्यांत आणील असें म्हणणारा एक उजवा गट राहील. या उजव्या गटांतहि साधारणपणें दोन पंथ राहतील. पूर्वापार चालत आलेली भारतीय संस्कृति व परंपरा यांच्याबद्दल प्रेम असणाऱ्या राजकीय शक्ति जनसंघ, हिंदुसभा, गणतंत्र परिषद यांच्या स्वरूपांत थोड्याफार संघटित राहतील; पण उत्तरोत्तर त्या निष्प्रभ होत जातील. कॉंग्रेस जहाल बनत चालली असें वाटणारा दुसरा उजवा पंथ स्वतंत्र-पक्षाच्या रूपानें संघटित होईल. भांडवलदार, व्यापारी व मोठे शेतकरी–मळेवाले ही मंडळी या पक्षाखालीं एकत्रित होतील. यांच्यापैकी ज्यांना जातीच्या संबंधामुळें कॉंग्रेसमध्ये जाणें शक्य आहे ते सतत कॉंग्रेसमध्यें जाण्याचा प्रयत्न करतील. आणि ज्यांची कॉंग्रेसमध्यें डाळ शिजणार नाहीं अशी मंडळी स्वतंत्र पक्षांत राहतील.

कॉंग्रेसपेक्षा जास्त जहाल राजकीय कार्यक्रम मांडणारे डावे पक्षहि साधारणपणें दोन गटांत विभागले जातील. लोकशाहीची फारशी फिकीर न बाळगणारी मंडळी कम्युनिस्ट वा त्यांचे सहप्रवासी बनतील; तर सामाजिक न्याय व आर्थिक समतेबरोबरच व्यक्तिस्वातंत्र्य या मूल्याविषयीं विशेष अगत्य असणारी लोकशाही समाजवादी मंडळी दुसऱ्या गोटांत बसतील.

महाराष्ट्राच्या राजकारणांतहि जवळपास याच चित्राचें प्रतिबिंब उमटेल. स्थूल मानानें राजकीय शक्तींची मोर्चेबंदी अखिल भारतीय धर्तीवरच होईल. कांहीं किरकोळ स्थानिक फरक संभवतील ते निराळे.

मधला कॉंग्रेस पक्ष व त्याच्या उजवी-डावीकडले निरनिराळे पक्ष या सर्वांनाच यापुढें आपापल्या विशिष्ट राजकीय विचारप्रणालीवर व कार्यक्रमांवर भर द्यावासा वाटेल. व तेंच भारतीय लोकशाहीच्या हिताचें ठरेल. कोणत्याहि एका जातीच्या किंवा पंथाच्या हितसंरक्षणासाठीं आपला पक्ष नाहीं, तर सर्व देशाच्या कल्याणासाठीं सर्वांत योग्य कार्यक्रम आपण सुचवीत आहोंत असा प्रत्येक पक्षाचा दावा असेल. म्हणजे राजकारणांत राजकीय कार्यक्रमात्मक प्रश्न महत्त्वाचे ठरत जातील; व सांप्रदायिक भूमिका निदान प्रकटपणें तरी घेतली जाणार नाहीं.

याला अपवाद फक्त रिपब्लिकन पार्टीचा असेल. पूर्वीच्या दलित समाजानें हिंदु धर्माच्या सामाजिक अन्यायाविरुद्ध बंड उभारून मोठ्या प्रमाणावर बौद्ध धर्म स्वीकारला आहे. अन्यायाविरुद्धच्या सात्विक संतापाचा आविष्कार या दृष्टीनें हें धर्मांतर अभिनंदनास्पद मानतां येईल. डॉ. आंबेडकरांच्या निर्वाणानंतर त्यांना श्रद्धांजलि वाहतांना पं. नेहरू म्हणाले होते : "He had revolted against something against which each of us should revolt." हजारों वर्षांच्या जबरदस्त अन्यायाविरुद्ध केलेलें तेजस्वी बंड म्हणून या धर्मांतराची स्तुति करणें योग्य आहे.

पण या स्तुतीच्या ओघांत या घटनेचा राजकीय अन्वयार्थ समजून घेण्याचें टाळूं नये. डॉ. आंबेडकरांच्या नेतृत्वाखालीं दलित वर्गीयांच्या संघटनेनें भारतीय राजकारणांत आतापर्यंत एक चमत्कारिक भूमिका घेतलेली आहे. त्यांचें दलित फेडरेशन, किंवा शेडयूल्ड कास्ट फेडरेशन किंवा आताची रिपब्लिकन पार्टी या संघटनेचें नेमकें वर्णन कसें करावें हा सर्वांनाच आतापर्यंत पेंच पडलेला आहे. केवळ जातीय वा सांप्रदायिक संघटना म्हणून तिला मुस्लीम लीग वा हिंदुसभेच्या पंक्तीला बसवावें तर इतर पंथ वा सांप्रदायांविरुद्ध त्यानें कधी फारशी आक्रमक भूमिका घेतली नाहीं. वर्गीय संघटना म्हणावें तर मजुरांच्या उद्योगवार संघटनांशीं तिचा छेद (cross) जातो,








आणि राजकीय संघटना म्हणावें तर समग्र भारतीय समाजासाठीं कांहीं विशिष्ट राजकीय कार्यक्रम तिनें जनतेसमोर ठेवला आहे असें नाहीं. किंवा अन्य कोणा राजकीय पक्षाशीं सातत्यानें हातमिळवणीचें धोरणहि ठेवलें नाहीं.

यामुळें रिपब्लिकन पार्टीची सध्याची मागणी फक्त नवबौद्धाना सवलती चालू रहाव्यात एवढीच राहते. याप्रमाणें एका विशिष्ट जमातीच्या संकुचित हितासाठी काम करणारी संघटना या दृष्टीनें रिपब्लिकन पार्टीला सांप्रदायिक पक्ष म्हणणें भाग आहे. त्यांच्या नवबौद्धांविषयीच्या मागणीला कोणत्याहि पक्षाचा विरोध नाहीं. म्हणजे एका मर्यादित मागणीसाठी चालविलेल्या संघटनेचें स्वरूप तिला प्राप्त झालें आहे. आणि वेगळें, स्वतंत्र राजकीय धोरण वा कार्यक्रम नसल्यानें या पक्षाला संधिसाधु राजकारण करणें अपरिहार्य ठरतें. यांचीं मतें ( votes ) ठराविक पण हुकमी आहेत. आणि राजकीय दृष्टिकोन व कार्यक्रम याबाबत कसलाहि आग्रह नाहीं. त्यामुळें कोणत्याहि पक्षाशीं यांची चुंबाचुंबी चालते. आणि इतरहि पक्ष एक प्रकारच्या हतबलतेनें यांच्याशीं तत्त्वशून्य देवाणघेवाण करावयास तयार होतात. भारताप्रमाणें महाराष्ट्रांतहि हा अनुभव वारंवार आलेला आहे.

तेव्हां या पक्षाच्या लोकांनीं आपल्या राजकीय भवितव्याचा जरा शांतपणें विचार केला पाहिजे. त्यांच्यासाठी ज्या राखीव जागा केव्हां ना केव्हां तरी नष्ट होणार आहेत, समग्र भारतीय जीवनाच्या राजकारणाशीं त्यांचे हितसंबंध गुंतले जाणार आहेत. अशा परिस्थितींत त्यांनीं आपल्या "रिपब्लिकन" या नव्या नांवाला साजेसा राजकीय कार्यक्रम स्वीकारला पाहिजे. इतर कांहीं कारणास्तव त्यांना समान विचारी पक्षाशीं एकरूप होतां आलें नाहीं तरी निदान त्यांनीं आतां स्वतंत्र, पण सर्वगामी राजकीय पक्ष म्हणून पुढे यायची तयारी दाखवली पाहिजे. केवळ दलित वर्गांचींच नव्हे तर सर्व मतदारांचीं मतें मागतां येतील अशा प्रकारचा सर्वांगीण जाहीरनामा त्यांना तयार करतां आला पाहिजे. किंवा हें सर्व करावयाचें नसेल—किंवा झेपणार नसेल—तर रिपब्लिकन पार्टीला जाति—उद्धारक संघटनेचें मर्यादित स्वरूप देऊन राजकीय कार्यासाठीं या पक्षांतल्या लोकांनीं इतर पक्षांत बरोबरीच्या नात्यानें शिरलें पाहिजे. इतर पक्ष आज त्यांचें स्वागत बरोबरीच्या नात्यानें करायला तयार आहेत. आणि तें योग्यच आहे. त्यांत निवडणुकींतील यशापयशाच्या तात्कालिक फायद्याप्रमाणेंच आपल्या समाजांतील अभिसरण वाढविण्याचा हेतुहि असेल— निदान अजाणता का होईना, सिद्ध होईल, हें आपण मान्य केलें पाहिजे.

महाराष्ट्रांतल्या आजच्या राजकीय परिस्थितीच्या संदर्भांत तर रिपब्लिकन पक्षांच्या कार्यकर्त्यांनीं अशा स्वरूपांचें आत्मपरीक्षण करून दूरदृष्टीनें निर्णय घेण्याची वेळ आलेली आहे. या मुद्द्याची चर्चा सर्वत्र होत असून, कुणालाहि हा मुद्दा सहज समजण्यासारखा असल्यानें याची येथें जास्त चर्चा करण्याचें कारण नाहीं.

## पक्षसंघटनांचें स्वरूप

हें थोडें विषयांतर झालें. मूळ मुद्दा असा कीं, भारताच्या राजकारणाप्रमाणेंच महाराष्ट्रीय राजकारणांतहि यापुढे जे प्रभावी पक्ष असतील ते जातीय वा सांप्रदायिक भूमिकेवर संघटित न होतां राजकीय दृष्टिकोन व कार्यक्रम यावर आधारलेले असतील. यांत इतर अनेक प्रकारच्या विकृति शिरण्याची शक्यता असली तरी राजकीय विचारांना अजिबात स्थानच असणार नाही अशी परिस्थिति मात्र संभवत नाही. त्यामुळें महाराष्ट्राच्या भावी राजकारणांत राजकीय विचारसरणींचा प्रभावहि पडणार आहे ही गोष्ट मनोमन पटवून घेऊनच त्यांत शिरणाऱ्या विकृतींचा विचार केला पाहिजे.

मुख्य विकृति अर्थात् जातीयवादाची राहील आणि याची बाधा सर्वांत जास्त अर्थातच कॉंग्रेसला होईल. त्याचीं कारणें दोन : एकतर कॉंग्रेसच्या आजच्या नेत्यांना आपलें बहुमत टिकविण्यासाठीं राजकीय कार्यक्रमाचा प्रचार करण्याची खटपट करण्यापेक्षा बहुसंख्य मराठी जातीचा अनुनय करणें हा खूपच जवळचा मार्ग वाटेल; व जाणता—अजाणता ते या मार्गाचा अवलंब करतील. दुसरें, कॉंग्रेसच्या हातांत सत्ता असल्यानें मराठा जातींतल्या महत्त्वाकांक्षी व प्रतिष्ठा प्राप्त झालेल्या व्यक्तींना कॉंग्रेसमध्यें जाणें किंवा राहाणें फारच फायद्याचें आहे हें उमजेल. म्हणून कॉंग्रेसनेते त्यांचा अनुनय करण्याआधीच हेहि कॉंग्रेसचें प्रिया-








साधन करूं लागतील – नव्हे, हा अंक १९५२ पासूनच सुरूं झाला आहे.

असें होणें अपरिहार्य आहे असें कांहीं जणांचें मत आहे. अपरिहार्य म्हणजे काय ? पक्षीय राजकारणाची विशुद्ध राजकीय पातळी कॉंग्रेस नेते सोडीत आहेत, ही वस्तुस्थिति आहे हें तर उघडच आहे. आणि सत्तेच्या सवंग राजकारणासाठीं तसें होणें स्वाभाविक आहे हेंहि समजूं शकतें. पण एवढयाच अर्थानें ही प्रवृत्ति अपरिहार्य आहे असें मानलें पाहिजे. आणि त्याचबरोबर हेंहि प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे की ही विकृति आहे, कॉंग्रेस संघटनेचा व नेतृत्वाचा हा कमकुवतपणा आहे. कमकुवतपणा मान्य झाला तरच त्या दृष्टीनें उपाययोजना होण्याची शक्यता असते. कॉंग्रेसचे नेते आज उघडपणें बोलतात कीं असें कांहीं सध्या प्रत्यक्षांत घडत असलें तरी तें त्यांच दूरगामी धोरण नाहीं, जातीयवादाचा ते जाणून बुजून स्वीकार करणार नाहींत. पण या त्यांच्या घोषणा खऱ्या असतील असें मान्य करण्यासारखें त्यांचें वागणें मात्र दिसत नाहीं. प. महाराष्ट्र व विदर्भ कॉंग्रेस कमिट्यांचे अध्यक्ष अपरिहार्यपणें मराठेच का असले पाहिजेत हें समजत नाहीं, मुख्य मंत्र्यांच्या विश्वासांतले ज्येष्ठ ब्राह्मण वा अन्य जातीय कार्यकर्ते कॉंग्रेसमध्यें नाहींतच की काय ? जवळ जवळ तीच गोष्ट ठिकठिकाणच्या जिल्हाध्यक्षांची. राज्यकारभारांतहि मराठ्यांबाबतचा पक्षपात वाढतो आहे असें बोललें जात आहे. याबाबतचे दाखले देणें सोपें नसतें हें कोणीहि मान्य करील. पण सर्वसाधारणपणें सरकारी नोकरवर्गांत असें बोललें जातें की मराठ्यांना जादा सवलती मिळतात, त्यांचे वशीले लवकर लागतात. याची पूर्ण कल्पना मंत्र्यांना प्रत्येक वेळीं असेलच असें नाहीं. पण ब्राह्मणांच्या बाबतींत दुजाभाव वाढतो आहे, व खालचे अधिकारी देखील मराठ्यांबाबत पक्षपातानें वागताहेत असें फारच बोललें जात आहे. या बाबतींत खरा निर्णय शेवटीं उच्चपदस्थ मंत्रीच घेऊं शकतील. तरीपण या दृष्टीनें परस्थांना कितपत माहिती मिळूं शकते ती जमविण्याचा प्रयत्न पुण्यांत कांहीं अभ्यासू तरुण करीत आहेत.

## आणखी एक वादाचा मुद्दा

ब्राह्मणब्राह्मणेतर वादांतील एका महत्त्वाच्या मुद्यावर थोडा नव्या दृष्टीनें विचार करणें आवश्यक आहे. ब्राह्मणेतर चळवळीच्या पुरस्कर्त्यांनीं व नेत्यांनीं असें वारंवार म्हटलें आहे कीं ब्राह्मण जातीनें 'शतकानुशतकें' इतरांवर अन्याय केला आहे. हें विधान कांही ब्राह्मण मंडळी देखील याच स्वरूपांत मान्य करून असें म्हणतात कीं, या अन्यायाचें परिमार्जन करण्यासाठीं ब्राह्मणांनीं आता सत्तासंन्यास घ्यावा. प्रा. शहांनीं अशा एका नेत्याचे उद्गार आपल्या लेखांत उद्धृत केले आहेत.

पण या बाबतींत माझें मत निराळें आहे. एकतर आजच्या राजकारणाची चर्चा करतांना शतकानुशतकांचा विचार करणें अगदी अप्रस्तुत आहे. परशुरामानें क्षत्रियाविरुद्ध मोहीम उघडली होती किंवा कांही ब्राह्मणांनीं शिवाजीचा राज्याभिषेक करण्याचें नाकारलें अशा प्रसंगांचा उल्लेख करून ब्राह्मणब्राह्मणेतर वाद पेटविण्याची गरज नाहीं. प्राचीन काळीं ब्राह्मणांचें समाजरचनेंत वर्चस्व होतें याचें मुख्य कारण धर्माचें अधिष्ठान. हिंदुधर्माप्रमाणें वर्णव्यवस्थेला एक दैविक अधिष्ठान मिळालें होतें. ही व्यवस्था ब्राह्मणांनीं जाणूनबुजून कायम केली कीं काय हा संशोधनाचा प्रश्न आहे-म्हणजे निरर्थक संशोधनाचा. ती व्यवस्था कोणीहि सुरूं केलेली असो, त्यावेळी ती सर्वमान्य व्यवस्था होती. त्यामुळें ब्राह्मणांचें वर्चस्व हेंहि सर्वमान्यच होतें. त्यामुळें या वर्चस्वाचा फायदा त्यांना मिळाला याबद्दल केवळ ब्राह्मणांना दोषी धरतां येणार नाही. तो त्या व्यवस्थेचाच दोष मानला पाहिजे. कारण नाहीतर क्षत्रियांना वर्चस्वाचा फायदा मिळाला नाही काय ? मग क्षत्रिय–म्हणजे महाराष्ट्रांतले मराठेहि तितकेच दुष्ट व अन्यायी होते ( व म्हणून आहेत ! ) असें म्हणावें लागेल.

दुसरें, आपल्या वर्चस्वाचा फायदा घेऊन ब्राह्मणांनीं इतरांवर अन्याय केले हेंहि खरें आहे. पण याचें कारण काय ? ब्राह्मण लोक वर्गीयदृष्ट्या जागरूक व संघटित होते म्हणून ? की ती जातच दुष्ट आहे म्हणून ? खरें पाहिलें तर कोणत्या समाजव्यवस्थेंत आतांपर्यंत ज्याला ज्याला म्हणून इतरांवर अन्याय करतां आला त्यानें त्यानें ती संधी पूर्णतया उपभोगली आहे. आतांपर्यंत 'बळी तो कान पिळी' हा न्याय सर्वत्र होता. यांत बळीचा जास्त दोष की त्याला बळी बनविणाऱ्या व्यवस्थेचा जास्त दोष ? आणि तसेच म्हटलें तर शस्त्रधारी क्षत्रियांइतका अन्याय दुसरा कोणी केला असेल काय ?








हें झालें इतिहासकालपुरतें. आधुनिक कालांत, म्हणजे ब्रिटिश अमदानीपासून याला निराळी कलाटणी मिळाली. शिक्षणक्षेत्रांत ब्राह्मणवर्ग मोठ्या प्रमाणावर शिरला व नोकरशाहीचा मक्ता मिळविला हें खरें. परकीय सत्तेखाली का होईना, पण अधिकार हातीं आल्यावर तो माणूस जमेल तितका जुलूम करणार ही साधी गोष्टच नाही का ? मुसलमान बादशहांच्या हाताखालील मराठे सरदारांनीं सर्वसामान्य प्रजाजनांना कमी लुटलें कां ? तेव्हां अन्याय केला तो अधिकाऱ्यांनीं ऱ्या किंवा त्या जातीनें नव्हे अशी भूमिका घेणेंच जास्त शास्त्रशुद्ध होईल.

म्हणजे आत्तापर्यंत ब्राह्मणांनीं इतरांवर अन्याय केला हें विधान सावधगिरीनेंच केलें पाहिजे. इतरांनींहि खूप अन्याय केले; ब्राह्मणांनीं ऋषीमुनींची परंपरा चालवली नाहीं, माणसांची परंपरा चालवली एवढेंच. त्यांनीं अन्याय केला यांचें कारण ती जातच दुष्ट आहे असें नाहीं, तर योगायोगानें विशिष्ट समाजव्यवस्थेंत व विशिष्ट परिस्थितींत ब्राह्मण जमात इतरांवर अन्याय करूं शकली एवढेंच.

आणि म्हणून आतां सूडाची भाषा जितकी चुकीची आहे तितकीच प्रायश्चित्ताची भाषाहि अयोग्य आहे. नव्या परिस्थितींत सर्व जनहित डोळ्यांसमोर ठेवून जातिनिरपेक्ष भूमिका घेणें हेंच शहाणपणाचें व लोकशाहीच्या हिताचें ठरेल. श्री. चिकित्सकांचा मुख्य मुद्दा असाच असावा असें वाटतें.

असो. काँग्रेसनेत्यांनीं व मराठा जमातीनेंहि आतां या दृष्टीनें विचार केला पाहिजे.

महाराष्ट्रांतील काँग्रेसला आज जातीयवादाचा रोग जडलेला आहे, तें विष हळू हळू मराठवाडा व विदर्भ या भागांतहि पसरलें जात आहे असें ठिकठिकाणचे जाणकार लोक बोलताहेत. खाजगी संभाषणांत काँग्रेसवालेसुद्धां हें मान्य करतात. प्रश्न उरतो तो एवढाच कीं, इथल्या काँग्रेस नेत्यांना हा रोग घालवायचा आहे काय, व घालवायचा असल्यास ते त्यावर काय उपाययोजना करणार आहेत ?

## काँग्रेसपक्षानें काय करावें ?

माझ्या मतें मुख्य उपाय असा आहे कीं, काँग्रेसनें यापुढे तत्त्वशुद्ध राजकीय कार्यक्रमाच्या आधारानें आपल्या पक्षाचा प्रचार केला पाहिजे. राजकीय जागरूकता वाढेल त्या प्रमाणांत जातीयवाद कमी होईल. म्हणून ती वाढविण्याच्या उद्योगाला मनापासून लागलें पाहिजे. त्याचें महत्त्वाचें पथ्य असें की क्षणिक फायद्यासाठीं तत्वाशीं तडजोड होऊं देता कामा नये. सीलिंगचा प्रश्न, सहकारी शेती, मजुरांच्या हिताच्या कायद्यांची अंमलबजावणी या व अशासारख्या प्रश्नांबाबत केवळ मातबर मराठ्यांचीं मतें आपल्याविरुद्ध जातील म्हणून काँग्रेसनें पडखाऊ धोरण स्वीकारूं नये. एकदा घेतलेल्या निर्णयावर खंबीरपणें उभें राहिलें पाहिजे. तसेंच सर्व राजकीय प्रश्नांबाबत सतत जागरूक राहून जनतेसमोर आपली भूमिका खंबीरपणें मांडली पाहिजे. चीनच्या आक्रमणाबाबत, वा केरळमधल्या कम्युनिस्ट अनागोंदीबाबत महाराष्ट्र काँग्रेसनें जो झोपाळूपणा दाखवला तो मुळीच स्पृहणीय नाही. अशा राजकीय प्रश्नांवर जर पक्ष सतत कार्यरत ठेवला तर अप्रत्यक्षरीत्या जातीयवादाला आळा बसण्यास मदत होईल.

दुसरें, काँग्रेस नेत्यांनीं हें दाखवून दिलें पाहिजे की आपल्या पक्षांत कोणत्याहि पातळीवर इतर जातींच्याविषयीं द्वेषभावना चेतवली जात नाहीं. "आतां यापुढे कनोजी ब्राह्मण व बाळाजीपंत नातु ( यांत सूर्याजी पिसाळचा उल्लेख नसतो. कारण तो मराठा ना ! ) यांची अवलाद नष्ट केली पाहिजे" अशासारखीं भाषणें करणारांना काँग्रेसमध्यें थारा असणार नाही हें नुसत्या शब्दानें नव्हे तर प्रत्यक्ष कृतीनें महाराष्ट्र काँग्रेसच्या नेत्यांनीं सिद्ध करून दिलें पाहिजे.

अशा प्रकारची राजकीय सचोटी व अल्पसंख्य जातींबाबत निःपक्षपाती धोरण या गोष्टी जर महाराष्ट्र काँग्रेसनें आपल्या वर्तणुकीनें सिद्ध केल्या तर एखादे वेळीं सगळेंच्या सगळें मंत्रिमंडळ फक्त मराठ्यांचें बनलें तरी तें "मराठ्यांचें राज्य" झालें असें कोणीहि सुबुद्ध नागरिक म्हणणार नाहीं.

मराठा जमात मोठ्या प्रमाणावर काँग्रेसमध्यें जात असल्यानें ब्राह्मणवर्ग काँग्रेसमधून बाहेर पडेल ( म्हणजे जवळ जवळ पडलेलाच आहे ) व विरोधी पक्षांत जाईल असा एक अंदाज केला जातो. येथे एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे. मराठा जमात ही महाराष्ट्रांत बहुसंख्य असल्यानें ती संघटितरीत्या काँग्रेसमध्यें गेल्यानें तिचा राजकीय फायदा होण्याची शक्यता आहे. म्हणून मराठ्यांच्या संदर्भात "ही जात अमूक गोष्ट करील"

वगैरे बोलणें शक्य आहे. तसेंच वर म्हटल्याप्रमाणें राजकारणांत सामूहिकरीत्या जातींच्या हालचाली संभवतात त्या दलित वर्गीयांबद्दल. पण या दोन जातींखेरीज इतर जातींच्याबद्दल असें म्हणता येणार नाहीं. कारण त्या अल्पसंख्य असल्यानें व फारशा संघटित नसल्यानें सत्ताधारी पक्षांत जाऊन त्यांना कांही विशेष फायदा मिळेल असें नाहीं. त्यामुळें जात म्हणून संघटितरीत्या हालचाल करण्यापेक्षा त्या जातींतले लोक व्यक्तिशःच राजकारणाचा विचार करतील. तसा विचार करतांना वैयक्तिक स्वार्थ हा तर बहुतांश व्यक्तींचा हेतु असेलच. पण जे कोणी थोडेफार लोक राजकारणाबाबत जागरूकतेनें व व्यापक दृष्टीनें विचार करणारे असतील ते मुख्यतः राजकीय धोरण व कार्यक्रम यांचा विचार करून आपल्याला पसंत पडणाऱ्या पक्षांत जातील.

### इतर पक्षोपपक्ष

विशेषतः अल्पसंख्य जातींचे जे लोक विरोधी पक्षांत जातील, त्यांची राजकीय दृष्टि जास्त विकसित झालेली असेल असें म्हणावें लागतें. सत्ताधारी पक्षांत शिरणें हा बहुसंख्यासाठीं काय किंवा अल्पसंख्यांसाठीं काय, नेहमीच राजमार्ग असतो. पण विरोधी पक्षांत जायची यातायात करायची तर त्यामागें थोडा तरी ध्येयवाद, थोडी तरी विचारप्रधानता असली पाहिजे. म्हणून ब्राह्मणांना आतां कॉंग्रेसमध्यें स्थान राहणार नसलें तरी "ब्राह्मणवर्ग" जहाल विरोधी पक्षांत जाईल असें म्हणणें चूक होईल. ब्राह्मणजमातीबद्दल हें तर मान्य केलेंच पाहिजे कीं त्यांची जातीय संघटना मुळीच सुसंघटित नाही. त्यामुळें जातीचें हित धोक्यांत आल्यानें ती जात कांहीं राजकीय हालचाल करील हें संभवत नाही. दुसरें, ब्राह्मणांपैकी जे कोणी राजकारणांत आहेत किंवा राजकारणाचा विचार करतात ते लोक राजकीय प्रश्नांबाबत नक्कीच जास्त जागरूक आहेत. राजकीय पक्षांत शिरायचेंच असलें तर ब्राह्मण माणूस मुख्यतः राजकीय कार्यक्रमाच्या आकर्षणामुळें शिरेल असें आपण मान्य केलें पाहिजे. ब्राह्मणवर्गाची सामुदायिक हालचाल संभवत नाही याचें एक द्योतक असें की अमुक एका पक्षांत ब्राह्मण व्यक्ति नेतृत्वाच्या जागीं आहेत म्हणून ब्राह्मणवर्ग मोठ्या संख्येनें त्या पक्षांत गेला आहे असें झालेलें दिसत नाहीं. हिंदुसभेला जातीय रंग आहेच. पण तो वगळला तरी महाराष्ट्रांत कम्युनिस्ट, प्रजा समाजवादी व समाजवादी पक्ष यांचे नेते ब्राह्मण असूनहि त्या त्या पक्षांत ब्राह्मण मंडळी मोठ्या प्रमाणावर गेली आहे असें नाही. अमुक या पक्षाचा नेता ब्राह्मण असल्यानें तो ब्राह्मणवर्गाच्या हितासाठीं विशेष प्रयत्न करील असें कोणाहि ब्राह्मणाला वाटत नाही. ते नेतेहि सर्व समाजाच्या राजकारणाचाच विचार करीत असतात हें त्यांच्या विरोधकांना देखील कबूल करावें लागेल. आणि म्हणून ब्राह्मणवर्ग जहाल विरोधी पक्षांत जाईल व इतर अल्पसंख्य जाति त्यांच्या नेतृत्वाखालीं संघटित होईल हा प्रा. शहांचा कयास खरा ठरण्याची मुळीच शक्यता नाही.

याचा अर्थ असा नाही की विरोधी पक्षांना जातीयतेची बाधा मुळीच होणार नाही. हिंदुमहासभा, कांही अशीं जनसंघ व रिपब्लिकन पक्ष हे स्थूलमानानें जातींचेच पक्ष रहातील. शेतकरी कामगार पक्षाबद्दल भविष्य वर्तविणें कठीण नसलें तरी अडचणीचें आहे. आज त्या पक्षांत मराठ्यांचेंच प्राधान्य आहे. मराठा जमातीला कॉंग्रेसमध्यें जाणें सोयीचें असल्यानें हा पक्ष थोड्याच काळांत फार रिता झालेला दिसायची शक्यता आहे. पण असला शेष शेतकरी कामगारपक्ष राजकीयदृष्ट्या जास्त जागरूक रहायची शक्यता आहे. कम्यूनिस्ट व प्रजा समाजवादी पक्ष यापैकी कुणाशीं जास्त मैत्री ठेवायची याचा निर्णय त्यांना लवकरच करावा लागेल.

कम्यूनिस्ट व प्रजा समाजवादी पक्ष हे प्रधानतः राजकीय कार्यक्रमावर आधारलेले पक्ष आहेत. सत्तेच्या राजकारणाच्या दृष्टीनें या पक्षांतील नेतृत्वांची मराठ्यांची संख्या वाढविण्याचा प्रयत्न होणें स्वाभाविक आहे. पण कॉंग्रसचें "मराठाप्रेम" व या पक्षाचें 'मराठाप्रेम' यांत फरक असेल. कॉंग्रेस सत्ताधारी असल्यानें मराठ्यांचें हित अधिक साधलें जाईल असें मराठा व इतर जमातींनाहि वाटूं लागेल. उलट विरोधी पक्षांच्या मराठाप्रेमानें त्या जातीचा विशेष लाभ किंवा अन्य जातीवर विशेष अन्याय संभवत नाहीं. आणि त्या पक्षांना अपरिहार्यपणें जातीय विचारापेक्षां राजकीय विचारावर भर द्यावा लागेल. कॉंग्रेसचें धोरण राजकीयदृष्ट्या कसें चुकीचें व अपूर्ण आहे यावरच जनतेचें लक्ष केंद्रित करून पर्यायी कार्य-







क्रम सुचविण्यानें विरोधी पक्षांची शक्ति वाढणार आहे. आणि याचा अप्रत्यक्ष परिणाम जातीयवादाचा राजकारणांतील प्रभाव कमी करण्यांत होणार आहे. 'तुम्ही अमूक जातीचे म्हणून आमच्या पक्षांत या' असें न सांगतां "आजच्या आपल्यासमोरील प्रश्नांबाबत सत्तारूढ पक्षाचें धोरण चुकीचें असून आमचें जास्त चांगलें आहे" अशा आवाहनानेंच विरोधीपक्षांना यापुढें काम करावें लागणार आहे. ते तसेंच वागतील असें सांगतां येत नसलें तरी शक्यता मात्र त्याच दिशेनें आहे असें दिसतें.

आणि त्यामुळें कॉंग्रेसलादेखील राजकीयदृष्ट्या जास्त जागरूक रहावें लागेल व हळुहळू राजकीय सचोटीचें प्रमाण वाढवावें लागल्यानें त्या पक्षांतहि मराठा जातीची आक्रमक वृत्ति कमी होईल. अर्थात् विरोधी पक्षाच्या या अंकुशामुळें जातीयवादाचा उपयोग कमी करण्यापेक्षा स्वतः होऊनच व्यापक दृष्टिकोनांतून हें विष कॉंग्रेसमधून कमी करण्याचा प्रयत्न कॉंग्रेस नेत्यांनीं केला पाहिजे. तरच महाराष्ट्रांतील लोकशाहीचें भवितव्य सुरक्षित राहण्याची शक्यता आहे.

---










श्री. म. शं. जोशी

# नव-महाराष्ट्राचा आर्थिक विकास

'इंडियन कमिटी फॉर कल्चरल फ्रीडम', 'एशियन ऑफिस ऑफ दि काँग्रेस फार कल्चरल फ्रीडम' आणि 'साधना साप्ताहिक' यांच्या विद्यमानें दि. १३, १४ व १५ मे रोजीं नवमहाराष्ट्रापुढील कांहीं प्रश्नांचा ऊहापोह करणारा एक परिसंवाद मुंबई येथें घडविण्यांत आला. त्यावेळीं 'महाराष्ट्राची आर्थिक प्रगति' या विषयावर ज्या तीन लेखांचा समावेश करण्यांत आला होता त्या लेखांच्या अनुषंगानें या विषयावरील कांहीं विचार व्यक्त करण्याचा प्रयत्न या लेखांत करीत आहोंत.

नवमहाराष्ट्रनिर्मितीच्या आनन्दाबरोबरच त्याच्या भावी प्रगतीसाठीं प्रयत्नांची पराकाष्ठा करण्याची जबाबदारी महाराष्ट्रांतील सर्व लहानथोर व्यक्तींवर आपोआपच येऊन पडते. आणि आजच्या आणीबाणीच्या परिस्थितींत प्रामुख्यानें भेडसावणारे जे आर्थिक प्रश्न आहेत त्यांची उकल करण्याचें कार्य अर्थशास्त्रांतील विचारवन्त मंडळीपुढें उभें राहतें. त्या दृष्टीनें या परिसंवादाकडे बऱ्याच मंडळींचें लक्ष मोठ्या आशेनें लागलें होतें व त्याविषयीं अनेक अपेक्षा बाळगण्यांत आल्या होत्या. परन्तु, एकन्दर विचार केला असतां अर्थशास्त्रावरील आलेल्या तीन लेखानीं विषयव्याप्ति, गूढप्रश्नांची उकल, नवीन दृष्टिकोन अथवा सखोल शास्त्रीय विवेचन या दृष्ट्या थोडीफार निराशाच केली असें खेदानें म्हणावें लागतें.

## १. प्रा. गंगाधर गाडगीळ यानीं व्यक्तविलेले विचार

प्रा. गंगाधर गाडगीळ यांनी भारतांतील एकूण लोहमार्ग १९५७–५८ सालीं ३४,८८९ मैल होता व १९५८ साली महाराष्ट्रांतील लोहमार्ग फक्त २,६५६ मैल होता असें सांगून महाराष्ट्रांत लोहमार्गाची जातींत जास्त वाढ होणें आवश्यक आहे असें प्रतिपादिलें. सार्वजनिक उद्योग क्षेत्रामध्यें महाराष्ट्राच्या वांट्याला कोणताहि मोठा भाग आलेला नाहीं व बृहन्मुंबईच्या आसपास जरी खाजगी उद्योगधंद्यांची थोडीफार भरभराट होत असली तरी त्यामुळें वरील उणीव भरून निघत नाहीं असें मत त्यांनीं प्रदर्शित केलें आहे.

उद्योगधंद्यांच्या विकेंद्रीकरणाचें तत्त्व मान्य करूनहि प्रा. गाडगीळ हे बृहन्मुंबईतील वाढत्या कारखान्यांना आळा घालूं नये असें आग्रहानें सांगतात. तसें केल्यास ते कारखाने बंगलोर वा मद्रास यांसारख्या परप्रांतीं उभारले जातील असें त्यांस भय वाटतें. बृहन्मुंबईतील सवलती व फायदे हे इतर ठिकाणीं उपलब्ध नाहीत व आणखी कांहीं वर्षे–कदाचित् वीस एक वर्षें–उपलब्ध होणार नाहींत असें त्यांचें मत आहे.

महाराष्ट्र राज्यांतील करभार हा तौलनिक दृष्ट्या जास्त आहे असा उल्लेख करून प्रा. गाडगीळ हे करविषयक कायदे व शासनव्यवस्था यांमध्यें सुबोधता आणावी असें सांगतात. तसेंच सरकारनें स्थापलेल्या विशिष्ट संस्थांनीं छोट्या उद्योगधंद्यांनां स्वस्त दरांत कर्ज द्यावीं असा उडता उल्लेखहि आढळतो. औद्योगिक क्षेत्रांवर (विशेषतः उत्पादन मालावर) भर देण्यांत यावा व त्या दृष्टीनें कृषियोजनेवर कमी भांडवल गुंतविलें तरी चालेल हा सिद्धांत ज्या राष्ट्रांना त्वरित प्रगति हवी आहे त्यांचेसाठीं निर्विवाद आहे व आपणहि त्याचा अवलंब करणें हितावह आहे असें त्यांचें मत आहे.

मोठे उद्योगधंदे निरनिराळ्या ठिकाणीं सुरू केले तर त्यांच्या अनुषंगानें त्यांना साहाय्यक असे छोटे उद्योगधंदे वसले जातात व त्या दृष्टीनेंहि विकासकेंद्रे फार महत्त्वाचीं आहेत. छोट्या उद्योगांवर होणाऱ्या चालू खर्चाचें कसेंतरी समर्थन करतां आलें तरी त्यावर जास्त भर देणें हें केव्हांहि अनिष्टच आहे. विशेषतः नवीन अद्यावत् कारखान्यांचें उत्पादन जास्त किफायतशीर असतांना छोट्या उद्योगांवर भर देणें योग्य नाहीं.

शिवाय, छोट्या उद्योगांची आजवरची प्रगतीहि मोठीशी समाधानकारक नाहीं असें ते सांगतात.

## वरील विचारांची छाननी

या लेखांत एकाच मुद्याची सविस्तर चर्चा आढळत नसून विविध गोष्टींचा नुसता उल्लेखच आहे. त्यामुळें लेखाची मांडणी सुसूत्र व मुद्देसूद नसून त्यांत एक तऱ्हेचा विस्कळितपणा प्राप्त झाला आहे, व एकंदर लेखाचें स्वरूप ठिगळें लावलेल्या गोधडीसारखें झालें आहे.

दळणवळणाच्या साधनांच्या अभावी मालाची वाहतूक खोळंबल्यामुळें आर्थिक प्रगतीला कसा धोका उत्पन्न होतो हें सर्वश्रुतच आहे. अशा वेळीं कोंकणांतील लोहमार्गासंबंधीं गाजत असलेला अनेक वर्षांचा फार जुना प्रश्न कोणालाहि प्रामुख्यानें आठवेल. या संकल्पित लोहमार्गामुळें कोंकणांतील व्यापारधंद्यावर कसा अनुकूल परिणाम होईल व त्यायोगें आज या आर्थिक दृष्ट्या अविकसित अशा प्रदेशाची भरभराट कशी झपाट्यानें होईल हा विचार प्रथम व्हावयास पाहिजे होता. परंतु या बाबतींतहि अनुल्लेखच दिसतो. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेमध्येंहि याबाबत कोणतीहि आशा नाहीं हें आतां उघड आहे. यावरून वास्तविक अत्यंत महत्त्वाच्या अशा या प्रश्नाकडे कसें दुर्लक्ष केलें जात आहे तें दिसून येईल.

उद्योगधंद्यांविषयीं लिहितानां, महाराष्ट्रांत नव्यानें उपलब्ध असलेलीं कांहीं खनिजें व कच्चा माल यांचा उपयोग करून कोणत्या कारखान्यांच्या वाढीस सरकारनें सुरवात केली पाहिजे याचा थोडासा विचार करणें आवश्यक होतें. नुकत्याच झालेल्या एका संशोधनावरून असें दिसून आलें आहे कीं कुलाबा जिल्ह्याच्या कांहीं भागांत एका विशिष्ट जातीच्या कापसाची लागवड फार चांगल्या तऱ्हेनें होऊं शकेल. अशा नवीन व अननुभवी क्षेत्रामध्यें सरकारनें स्वतः लक्ष घालून लोकांना धडा घालून दिला पाहिजे. तसेंच रत्नागिरी, कोल्हापूर येथील भागहि अनेक सुप्त खनिजांनीं समृद्ध आहे व तेथील निसर्गसंपत्तीची कल्पना हळूं हळूं होऊं लागली आहे ही आनंदाची गोष्ट आहे. जंगलसंपत्तीहि येथें विपुल आहे. महाराष्ट्रांत एकेकाळीं अमाप साग होता याची प्रचीति तत्कालीन बांधकामावरून येते. तसेंच औषधि-वनस्पतींचें तर हें आगरच आहे. अशा बहुमोल वनस्पतींचा योग्य तो उपयोग करून गरीब जनतेला स्वस्त किंमतींत औषधांचा पुरवठा करणें हें सरकारचें कर्तव्य आहे.

वाहतुक, वीज बॅगस्, यांसारख्या गोष्टी इतर प्रदेशांत योग्य त्या प्रमाणांत नाहींत हें नाकारून चालणार नाहीं. परन्तु नियोजनाच्या सर्वव्यापी धोरणांमध्यें या सर्व गोष्टींचा जास्तींत जास्त प्रसार देशांतील खेडोंपाडीं करण्याचें योजिलें आहे व त्यानुसार कार्य चालूं आहे. कोयना योजना पूर्ण झाल्यावर बऱ्याच प्रदेशाला वीज उपलब्ध होऊं शकेल. कोकणांतील लोहमार्गाची योजनाहि त्या दृष्टीनें आवश्यक आहे. विशेषतः सरकारनें स्वतः या बाबतींत लक्ष घालून एकादा नवा पायंडा पाडल्यावर इतर खाजगी उद्योगांना तें एक आकर्षण होईल व त्या त्या प्रमाणांत त्या प्रदेशांची वाढ होईल.

बृहन्मुंबईतील वाढत्या उद्योगधंद्यांस आळा घालणें व त्यांचें विकेंद्रीकरण करणें हें इतर प्रदेशांच्या दृष्टीनेंच केवळ हितावह नसून बृहन्मुंबईतील चालूं परिस्थितीच्या दृष्टीनेंहि अत्यंत आवश्यक आहे या गोष्टीची जाणीव नीटशी झालेली दिसत नाहीं. तसेंच आर्थिक प्रगतीचा विचार करतांना सामाजिक, मानसिक, नैतिक, आदि मूल्यांचाहि प्रामुख्यानें विचार करणें आवश्यक आहे. आज मुंबईतील असंख्य लोकांचें जीवन आरोग्यदृष्ट्या इतकें अनुत्साही व धोकादायक होऊन बसलें आहे कीं कारखान्यांची वाढ अशीच होऊं दिली तर तेथील समाजजीवनावर निश्चित वाईट परिणाम होतील यांत शंका नाहीं. किमान राहण्याचा प्रश्न जरी घेतला तरी आज त्यानें इतकें भेसूर स्वरूप धारण केलें आहे कीं, वेळ, पैसा व कष्ट या तीनहि दृष्टीनें लोकांचें जीवन अत्यन्त कृत्रिम बनून क्रूरपणानें भरडून निघत आहे असें दिसून येईल. अशा वेळीं मुंबईतील लोकसंख्या जर अशीच वाढूं दिली तर त्याचे सर्व दृष्ट्या अत्यंत घातुक परिणाम होतील. या दृष्टीनें प्रा. गंगाधर गाडगीळ यांनी केलेलें विवेचन थोडेसें धरसोड वृत्तीचें आहे व त्यांनी दिलेलीं उदाहरणेंहि न पटण्यासारखीं आहेत.

औद्योगिक क्षेत्रांतील प्रगतीवर जास्त भर देण्यांत यावा याबद्दल सहसा कोणाचेंहि दुमत होणार नाहीं. परंतु त्या संदर्भांत प्रा० गाडगीळ यांनी केलेला युक्तिवाद असमाधानकारक आहे. जगामध्यें धान्याचें उत्पादन भरपूर प्रमाणांत होत आहे व तें आपणांस अत्यल्प










किंमतींत उपलब्ध होऊं शकेल हा त्यांचा भरंवसा सर्वथा अस्थानीं आहे. नुकत्याच मिळालेल्या अमेरिकेकडील धान्याबाबतदेखील हें विधान करणें धाष्टर्याचेंच होईल. प्राध्यापक महाशयांकडून अशा विचारसरणीची अपेक्षा नव्हती. अर्थात् विस्तारभयास्तव या बाबतींतील जास्त खोल विवेचनांत जाणें इष्ट नाहीं.

विकास केंद्रें, मोठया उद्योगधंद्यांचें महत्त्व व इतर कांहीं प्रश्न यांविषयीं दुसऱ्या लेखामध्यें सविस्तर उल्लेख असल्यामुळें त्याबाबत येथें लिहिण्याचीं जास्त आवश्यकता नाहीं. एकंदर दृष्टया या लेखाचें स्वरूप, विचार व मुद्दे हे निराशाजनकच वाटतात.

## २. प्रा. कांता रणदिवे यांनीं व्यक्तविलेले विचार

महाराष्ट्राच्या औद्योगिक प्रगतीविषयक आपल्या लेखांत प्रा० कांता रणदिवे यांनीं आंतर्विभागीय भेदांवर जास्त भर दिला आहे. देशाच्या आर्थिक प्रगतीविषयक धोरणामध्यें आंतर्विभागीय प्रश्नांना योग्य तें महत्त्व दिलें पाहिजे असें त्या आर्जवून प्रतिपादतात. तसें न झाल्यास, एकत्रित दृष्टया देशाची प्रगति दिसत असली तरी दुसऱ्या बाजूनें कांहीं विभाग हे मागासलेलेच राहतील. हा मुद्दा अत्यंत महत्त्वाचा असल्यामुळें नवमहाराष्ट्रनिर्मितीबरोबर त्याच्या ‘ सर्वांगीण ’ विकासाचा विचार होणें अगत्याचें आहे.

मागासलेल्या देशांमध्यें आर्थिक दृष्टया आंतर्विभागीय तफावत फार मोठया प्रमाणांत आढळते आणि महाराष्ट्र त्याला अपवाद नाहीं. महाराष्ट्र हें भारतांतील दोन नंबरचें औद्योगिक राज्य असलें तरी त्यांतील प्रगतीचा मोठा वांटा मुंबईसारख्या शहराचा आहे हें आंकडेवारीवरून स्पष्ट दिसून येईल. औरंगाबाद हा त्यांतल्यात्यांत मागासलेला विभाग आहे. तसेंच मुंबई विभागांतून बृहन्मुंबई वगळली तर त्याची पातळी पुणें व नागपूर विभागांइतकीच आहे. यावरून महाराष्ट्राची औद्योगिकता किती केंद्रित आहे तें दिसून येईल व विशेषतः मूलभूत उद्योगधंद्यांबाबतचा मागासलेपणा प्रकर्षानें प्रकट होईल. सरकारी आर्थिक व्यवहारांचेद्वारा वा इतर पद्धतीनें पैसा जरी मागासलेल्या विभागांत पाठविला जात असला तरी त्या भागाची उत्पादनशक्ति वाढविणें हें सर्वच दृष्टीनें अत्यन्त आवश्यक आहे असा त्यांचा आग्रह आहे.

औद्योगिक प्रगतीच्या मार्गावर सुरवातीस कांहीं ‘ विकास केंद्रें ’ ( Growth Centres ) निर्माण होणें अपरिहार्य आहे. दळणवळण, मालाचा पुरवठा, बाजारपेठ वगैरे बाबतींत या केंद्रानां अनुकूल परिस्थिति लाभल्यामुळें त्यांची आपोआपच भरभराट होते हें मुंबईच्या विकासावरून सहज कळून येईल. अशा तऱ्हेच्या अतिरिक्त केंद्राकडे प्रा० रणदिवे साशंक दृष्टीनें पाहतात. कारण त्यांचेमुळें अनेक आर्थिक व सामाजिक पेंच-प्रश्न निर्माण होतात. एकतर दाट लोकवस्तीमुळें लोकांचें राहणीमान अत्यन्त निकृष्ट दर्जाचें होऊन बसतें व त्याचबरोबर मागासलेल्या प्रदेशांच्या प्रगतीवरहि प्रतिकूल परिणाम होतो. ( याविषयीं वर उल्लेख केला आहेच ) कोणत्याहि कसोटीनें पाहिलें असतां बृहन्मुंबईची लोकसंख्या ही निश्चित जास्तच ठरेल व त्या दृष्टीनें केवळ आणखी भर घालणें थांबवूनच चालणार नाहीं तर कांहीं लोकांचें येथून स्थलांतर करणें हें अगत्याचें आहे. तरच या मोठ्या शहरांतील बिकट प्रश्नांना उत्तर सांपडेल.

अर्थात् मागासलेल्या भागांच्या प्रगतीसाठीं अशीं प्रकरणात्मक कारणें शोधण्यापेक्षां त्यांच्या प्रत्यक्ष औद्योगीकरणावरच भर देणें जास्त उचित ठरेल. नाहीं तर निरनिराळ्या भागांतील उत्पन्नांतील अंतर जास्त वाढत जाईल व आधीच औद्योगिक दृष्टया पुढारलेल्या भागांनाच जास्त उत्पन्नाचा वांटा मिळेल. सर्व भागांचें उत्पन्न सारखें होणें जरी शक्य व हितावह नसलें तरी एकूण पुरवठ्याच्या समान व योग्य प्रमाणांत सर्व भागांना वांटा मिळावा हें केव्हांहि हितकर ठरेल.

प्रा. रणदिवे यांनीं आणखी एक महत्त्वाचा मुद्दा मांडला आहे कीं, अशा तऱ्हेच्या मागासलेल्या भागांच्या सर्वांगीण विकासासाठीं ग्रामोद्योग, कुटीरोद्योग वा यांसारख्या छोट्या उद्योगधंद्यांच्या वाढीनें काम भागणार नाहीं, तर त्यासाठीं मूलभूत उद्योगांचें मोठ्या प्रमाणांत विकिरण होणें अत्यावश्यक आहे. त्यायोगें सर्व भागांतील सुप्त शक्तींना प्रेरणा मिळून इतर अनेक छोट्या धंद्यांना चालना मिळेल. अशा महत्त्वाच्या व मोठया कारखान्यांच्या आधारानेंच सर्वांगीण विकासास मदत होईल. विकिरणाचा हाच अर्थ त्यांना अभिप्रेत आहे व त्यासाठीं ‘ विकेंद्रित केंद्रीकरणाची ’ (Decentralised Concentration ) गरज आहे असें








त्यांचें म्हणणें आहे. राज्यांतील निरनिराळ्या विभागांत अशीं 'विकास-केंद्रें' निर्माण केल्यानंतर त्या त्या केंद्राभोंवतींचा आर्थिक व्यवहार आपोआप वाढीस लागेल व विकास त्वरित होईल याबद्दल त्यांना संदेह नाहीं.

अशा तऱ्हेचें विकेंद्रीकरण आपोआप होईल अशी त्यांची मुळीच अपेक्षा नाहीं. उलट विरुद्ध दिशेनें घटना घडत असल्यामुळें आर्थिक प्रगतीच्या काळांत एखाद्या विकासकेंद्राच्या ठायीं सर्व शक्ती खर्च पडून इतर मागासलेला भाग तसाच मागें पडतो. व अशा ठिकाणीं मुद्दाम जारीनें काम सुरू केलें नाहीं तर आंतर्विभागीय विषमता सारखी वाढतच राहील यांत संशय नाहीं. याचें ढळढळीत उदाहरण म्हणजे मुंबईसारखें औद्योगिक आघाडीवरचें शहर व कोंकण-मराठवाड्यासारखा मागासलेला भाग.

आपल्या लेखाच्या उत्तराधात त्यांनीं पंचवार्षिक योजनांचे द्वारा या बाबतींत काय प्रयत्न झाले त्याचा परामर्श घेतला आहे. पहिल्या योजनेच्या काळांत कांहीं करतां येण्यासारखें नव्हतें हें मान्य. कोठें तरी दुसऱ्या योजनेमध्यें विकेंद्रीकरणाबद्दल स्पष्ट उल्लेख असूनहि प्रत्यक्ष उपाययोजना कितपत केली जात आहे हें शंकास्पद आहे. सुसंबद्ध योजनेच्या अभावीं लोकशाहीमध्यें राजकीय वर्चस्वाचा प्रभाव कसा पडतो याचें हें एक उदाहरण आहे. वर उल्लेख केल्याप्रमाणें, मागासलेल्या प्रदेशांच्या विकासांतील मुख्य अडचण म्हणजे त्या भागांत दळणवळणाचीं साधनें, वीज पुरवठा वगैरे बाबतींत असलेल्या उणीवा; आणि या उणीवा भरून काढण्याची कामगिरी प्रामुख्यानें सरकारनें आपल्या सार्वजनिक क्षेत्रांतील गुंतवणुकीद्वारा करावयास पाहिजे. कारण अशा अविकसित भागांत खाजगी भांडवल केवळ अभावानेंच आढळतें. आंकडेवारीच्या द्वारा औद्योगिक प्रगति कशी प्रामुख्यानें मुंबई शहरापुरतीच केंद्रित आहे हें दाखवून त्या म्हणतात कीं, १९५५ मध्यें जवळजवळ वीसपट जास्त वीजपुरवठा केवळ ठाणे जिल्ह्यांत झाला आहे. याचा अर्थ असा कीं उद्योगधंद्यांची वाढ बृहन्मुंबईच्या आसपासच जास्त प्रमाणांत होत आहे. नवीन परवान्याच्या बाबतींतहि मे १९५८ पर्यंत बृहन्मुंबईचाच वांटा फार मोठा होता.

मुंबईत कारखाने उभारण्यावर ठेवलेल्या निर्बंधामुळें नवीन कारखाने मुंबईच्या परिसरांतील उपनगरांत उघडले जात आहेत. यामुळें मागासलेल्या भागांच्या प्रगतीवर कांहीं परिणाम होत नाहींच, व शिवाय फाजील केंद्रीकरणाचे तोटेहि कायमच राहतात. उपनगरांची लोकसंख्या सातपटीनें वाढली आहे व शहरांतील आरोग्यास अपायकारक वातावरण आतां उपनगरांतहि झपाट्यानें पसरत आहे. अशा तऱ्हेनें या धोरणामुळें लोकाच्या राहणीमानावर विपरीत परिणाम होत असून त्यांना जीवनांतील किमान गरजा भागविणेंहि कठिण होऊन बसलें आहे.

महाराष्ट्राच्या औद्योगिक विकासाच्या विकेंद्रीकरणावर भर देतांना प्रा. रणदिवे यानीं उदाहरणादाखल रत्नागिरी जिल्ह्यांतील लोह, बॉक्साइड, मँगनीझ, क्रोमाइट वगैरे खनिजांचा सांठा उपयोगांत आणण्याविषयींचा उल्लेख केला आहे. कोयनेच्या विजेचा उपयोगहि या ठिकाणीं करून घेतां येईल, व अशा तऱ्हेनें औद्योगिक वसाहत उभारण्यास कोंकणांतून मुंबईस जाणाऱ्या हजारों कामगारांना घरबसल्या उद्योग मिळेल व त्यांचें जीवन सुखावह होईल. या दृष्टीनें रत्नागिरी येथें अॅल्युमिनियमचा कारखाना उभारण्याचा निर्णय स्वागतार्ह आहे. तसेंच जवळच असलेल्या कोल्हापूर जिल्ह्यामध्यें पांच कोटी टन बॉक्साइटचा सांठा असल्याचें तज्ञांचें मत आहे. नागपूर, भंडारा या जिल्ह्यांत कारखान्यांची उभारणी केली जात आहे. औरंगाबाद विभाग मात्र या सर्व दृष्ट्या मागासलेला आहे. परन्तु प्रा. रणदिवे यानीं कांहीं तज्ञांचे दाखले देऊन असें दर्शविलें आहे कीं, अशा प्रदेशांतहि तेथील बाजारपेठांचें महत्त्व लक्षांत घेऊन कच्च्या मालाचा पुरवठा सन्निध नसतांहि औद्योगिक कारखान्यांतील कांही भागांचें उत्पादन करणें हें श्रेयस्कर आहे. नवीन उभारलीं जाणारीं विद्युत् केंद्रें व त्यायोगें सुलभ होऊं शकणारे कांहीं रासायनिक द्रव्यांचे कारखाने हे छोट्या प्रमाणांत निरनिराळ्या ठिकाणीं विखुरतां येतील व त्यायोगें कापड, औषधें, प्लॅस्टिक्स् यांसारख्या इतर अनेक कारखान्यांना मदत करतां येईल. मुंबईतील बजबजपुरी कमी करण्यासाठीं रेयॉन्, प्लॅस्टिक्स् यांसारखे कारखाने तेथून हलविले पाहिजेत असें प्रा. रणदिवे बजावतात.

मुंबई राज्याच्या 'मास्टर प्लॅन'नें या प्रश्नावर कोणत्याच तऱ्हेनें विशेष प्रकाश टाकलेला नाहीं वा

ठाम मत प्रदर्शित केलेलें नाहीं असें सांगून प्रा. रणदिवे या आपल्या धोरणविषयक विवेचनांत केवळ परवाने देण्याच्या पद्धतीवर अवलंबून राहून चालणार नाहीं असें सांगतात. त्यामुळें कदाचित् कारखाने अजिबात उभारले जाणारच नाहीत अशी भीति व्यक्त करून त्यां म्हणतात कीं, या बाबतींत सरकारनें प्रत्यक्ष मोठ्या कारखान्यांचा पाया अशा मागासलेल्या विभागांत घालून नवीन औद्योगिक केंद्रें वसवावींत किंवा खाजगी उद्योगधंद्यांना त्या मार्गानें प्रवृत्त करण्यासाठीं प्रत्यक्ष मदत करावी ( उदा० वीज पुरवठा – आकार वा कर यांत सूट, कमी दरांत कर्जे, देणग्या वगैरे ) अर्थात्, याबाबतींत सरकारच्या क्रियाशील सहकार्याचा वांटा फार महत्त्वाचा आहे. कोयनायोजनेद्वारा निर्माण होणारी वीज ( पहिला हप्ता ) ८० टक्के प्रमाणांत जून १९६१ पासून बृहन्मुंबईच्या वांट्यास द्यावी याबाबतींत त्या निरुत्साही आहेत.

जातां जातां छोट्या उद्योगधंद्यांचें रोजगार पुरविण्याच्या दृष्टीनें व कमी भांडवलाच्या दृष्टीनें असणारें स्थान यांचा उल्लेखहि आढळतो. मात्र अशा छोटया उद्योगधंद्यांमध्यें विकासाला प्रेरणा देण्याची शक्ति नसते व त्यावर अवलंबून राहून आर्थिक उन्नतीची आशा करणें हें योग्य नव्हें असें त्यांचें प्रतिपादन आहे. ( मोठया उद्योगधंद्यांमध्यें असणाऱ्या प्रेरक शक्तीबद्दल वर उल्लेख आलेला आहेच ) मात्र मोठया उद्योगधंद्यांना साहाय्यक म्हणून या छोटया उद्योगांचें स्थान महत्त्वाचें आहे व ज्या ठिकाणीं मोठे कारखाने निघणें अशक्य आहे अशा ठिकाणीं या छोटया कारखान्यांचें जाळें पसरविणें हितावहच ठरेल. जपानसारख्या देशांत त्यांचें महत्त्व अजूनहि टिकून आहे त्याचें कारण हे व्यवसाय मोठ्या धंद्यांना चिकटून व सहकार्यानें वाढत असल्यामुळें एकमेकांस पूरक ठरतात हेंच होय.

अशा तऱ्हेच्या विकासकेंद्रांसाठीं होणाऱ्या खर्चाची जाणीव प्रा. रणदिवे यानीं ओळखली आहे व त्यामुळें इतर कार्यावर कमी पैसा खर्च करावयास उरल्यामुळें उत्पन्नांतील उणीवांची कल्पनाहि त्यानां आहे. परंतु दूरदृष्टीनें विचार केला असतां भविष्यकालामध्यें परिणामी अशा तऱ्हेच्या योजनेनें जास्त फायदा होईल असें त्यांचें म्हणणें दिसतें. विभागांच्या सर्वांगीण विकासासाठीं अशा तऱ्हेनें पावलें टाकणें आवश्यक आहे व त्यासाठीं खर्चाकडे मागेपुढें पाहणें हितावह ठरणार नाहीं. विशेषतः आर्थिक नियोजनाच्या या काळामध्यें जर केवळ सर्वसामान्य नियमांप्रमाणेंच औद्योगीकरण होणार असेल तर नियोजनाचा अर्थच काय ? असा त्यांचा सवाल आहे.

## प्रा. रणदिवे यांच्या विचारांचें परीक्षण

प्रा. रणदिवे यांच्या लेखाची मांडणी सूत्रबद्धतेनें केली असल्यामुळें तो लेख जास्त आकर्षक वाटतो व त्यांतील कांहीं मुद्दे विचार करण्यासारखे आहेत. कारखान्यांच्या वा औद्योगिक केंद्रांच्या विकेंद्रीकरणाबाबत कोणाचेंहि दुमत होणार नाहीं. परन्तु त्याच वेळीं केवळ एका राज्याचा वा त्यांतील एका विभागाचा अलगपणानें विचार करून चालणार नाहीं तर भारताचा एक घटक या दृष्टीनेंच त्याचा विचार करावा लागेल व एखादी योजना ही आर्थिक दृष्टया कितपत योग्य आहे व तिची कार्यक्षमता कोणत्या ठिकाणीं जास्त प्रभावी ठरेल याचा सर्वांगीण विचार भारतीय पातळीवरूनच करावा लागेल. आणि अशा वेळीं कदाचित् भारताच्या एकंदर जलद प्रगतीच्या दृष्टीनें एखाद्या विभागाचा नजीकच्या भविष्यकाळांतील विकास पाहिजे तितका होणें हें श्रेयस्कर ठरेलच असें नाहीं. तेव्हां ज्यावेळीं आपणांस देशाची एकंदर प्रगति झपाट्यानें करावयाची असते त्यावेळीं त्यांतील सर्व विभागाकडे सारखेंच लक्ष पुरविणें व त्यांचा प्रत्येकाचा विकास सारखाच घडवून आणणें हें दुरापास्त आहे. एवढेंच नव्हें तर याहि पलीकडे जाऊन असें म्हणावें लागेल कीं, या बाबतींत संपूर्ण देशानेंहि स्वावलंबनाचें धोरण अंगिकारणें चूकच ठरेल. एखाद्या गोष्टीचें उत्पादन, आंतरराष्ट्रीय दृष्ट्या विचार करतां, स्वराष्ट्रामध्यें जास्त खर्चाचें होणार असेल व त्यांच पैशांत दुसऱ्या जास्त महत्त्वाच्या वस्तूंची निर्मिति करणें शक्य असेल तर स्वावलंबनाचें धोरण न अनुसरतां आंतरराष्ट्रीय व्यापारद्वारा आपल्याला जास्त खर्चिक असणाऱ्या गोष्टी मिळविणें हें केव्हांहि श्रेयस्कर ठरेल. त्यायोगें राष्ट्राची प्रगतीहि जास्त त्वरेनें व परिणामकारकरीत्या होऊन जागतिक उत्पादनाचा विचार केला असतांहि ती गोष्ट फायदेशीर ठरेल. याचा अर्थ विकेंद्रीकरण नको असा नव्हे किंवा त्याचें महत्त्व कमी उल्लेखण्याचा मानस नाहीं. परन्तु सबंध देशाच्या एकंदर प्रगतीच्या दृष्टीनें व

अशा आणीबाणीच्या काळांत या सर्व गोष्टींकडे सारखें लक्ष ठेवणें हें अशक्य आहे यांत शंका नाहीं.

दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे विभागांबद्दलची. नवमहाराष्ट्र राज्याचे मुंबई, पुणें, औरंगाबाद व नागपूर असे चार विभाग राजकीय दृष्ट्या पाडलेले आहेत. व आंतर्विभागीय विकेंद्रीकरणाबाबत विवेचन करतांना प्रा. रणदिवे यानीं साहजिकच त्यांचाच विचार केलेला आहे. परन्तु आर्थिक विकासाचा प्रश्न व औद्योगिक विकेंद्रीकरण या गोष्टींचा ऊहापोह करतांना केवळ राजकीय वा भौगोलिक विभागांचा विचार न करतां आर्थिक विभागांचा विचार करणें आवश्यक आहे. आणि आर्थिक दृष्ट्या पडणारे विभाग हे राजकीय वा भौगोलिक विभागांशी तंतोतंत जुळणारेच असतील असें नाहीं. त्या दृष्टीनें वर सांगितल्याप्रमाणें सबंध देशाची पार्श्वभूमि लक्षांत घेऊन अशा तऱ्हेचे आर्थिक विभाग जर पाडण्यांत आले तर त्या आर्थिक विभागांची प्रगति मालाचा पुरवठा, बाजारपेठा वगैरे आर्थिक मुद्यांचे दृष्टीनें समप्रमाणांत करणें शक्य होईल. व अशा आर्थिक विभागांमध्यें औद्योगिक विकेंद्रीकरणाचें तत्त्व पूर्णतया आचरण्यांत स्वारस्य आहे. नाहींतर एखाद्या मागसलेल्या विभागांत कोणत्याहि तऱ्हेच्या सुप्त शक्ती अस्तित्वांत नसतील तर त्या ठिकाणी अवास्तव पैसा खर्च करूनहि कांहींच निष्पन्न होणार नाहीं. एवढ्याचसाठीं विभागांचें राजकीय वा भौगोलिक स्वरूप लक्षांत न घेतां आर्थिक विभागांचें तत्त्व डोळ्यापुढें ठेवून व सबंध देशाच्या पार्श्वभूमीचा विचार करून नवीन उद्योगधंद्यांची सुरवात करणें आवश्यक आहे व या दृष्टीनेंच विकेंद्रीकरणाचें तत्त्व अंमलांत आणणें योग्य व श्रेयस्कर आहे.

मुंबईसारख्या गजबजलेल्या शहरांतील लोकांच्या राहणीमानाचा प्रश्न सोडविण्यासाठीं येथील लोकांचें स्थलांतर केलें पाहिजे हा विचार धाडसी पण फार महत्त्वाचा आहे. यासंबंधांत वर विवेचन आलेंच आहे. मात्र ही जबाबदारी सरकारलाच आपल्या शिरावर घ्यावी लागेल व त्यासाठीं प्रारंभीं थोडाफार विरोध सहन करावा लागला तरी अंतीं त्याचे परिणाम हे सर्व दृष्ट्या हितावहच होतील हें निःसंशय.

दळणवळणाचीं साधनें, वीजपुरवठा यांसारख्या सोयी उपलब्ध झाल्यानंतर उद्योगधंद्यांचे विकेंद्रीकरणास जास्त मदत होईल हें लक्षांत घेतलें पाहिजे. एक गोष्ट प्रामुख्यानें सांगावीशी वाटते कीं वाहतुकीबाबत दोनहि पंचवार्षिक योजनांमध्यें महाराष्ट्राची प्रगति फारशी झालेलीच नाहीं असें म्हटलें तरी चालेल. कोंकण-रेल्वेबद्दलचा उल्लेख वर आलेलाच आहे. तेव्हां या अत्यंत महत्त्वाच्या गरजांचा पाठपुरावा घेतल्याशिवाय विकासकेंद्रांची स्थापना होणें कठीण आहे व त्या बाबतींत सरकारनेंच लक्ष घालून सर्व सोयी उपलब्ध करून देण्याची तजवीज केली पाहिजे. अशी पार्श्वभूमि तयार केल्यानंतर पूर्वी सांगितल्याप्रमाणें रत्नागिरीसारखें शहर हें एक महत्त्वाचें औद्योगिक केंद्र बनेल यांत शंका नाहीं.

विकेंद्रीकरणाबाबत मूलभूत उद्योगांचें महत्त्व व त्यांचे अंगी असलेली विपुल प्रेरणाशक्ति याबाबत पूर्वी विवेचन केलेंच आहे, व त्याचवेळीं छोट्या उद्योगांचें स्थान दुय्यम दर्जाचें असल्याबद्दल उल्लेख केलेला आहे.

शेवटीं असें म्हणावें लागेल कीं पार्श्वभूमि वा विकास-केंद्र निर्मिति याबाबतींत केंद्रीय नियोजन व प्रांतीय नियोजन यांत संघर्ष येऊं न देतां शक्य तों अधिक सवलती सर्व आर्थिक विभागांना मिळणें आवश्यक आहे व एकदम सर्व विभागांची समान उन्नति करण्याच्या प्रयत्नांपेक्षां नजीकच्या काळांत संपूर्ण देशाची एकंदरित दृष्टया सर्वांगीण प्रगति कशी लवकर होईल हें पाहणें जास्त श्रेयस्कर आहे.

## ३. प्रा० स. ह. देशपांडे व प्रा० राव यांनीं मांडलेले विचार

महाराष्ट्राच्या शेती–विकासाबद्दल प्रा० देशपांडे व प्रा० राव यांच्या लेखाचे तीन भाग पडतात. त्यापैकीं पहिले दोन भाग आंकडेवारीनें भरलेले असून केवळ माहितीनिदर्शक आहेत तर तिसऱ्या भागांत शेती-विषयक धोरणासंबंधीं कांहीं विचार प्रकट केलेले आहेत. आपल्या दृष्टीनें तिसरा भागच महत्त्वाचा असून पहिले दोन भाग हे महाराष्ट्राच्या शेतीविषयक आंकडेवारीवर प्रकाश टाकणारे म्हणून उपयोगी ठरतात.

पहिल्या भागांत महाराष्ट्र व भारत यांमधील तौलनिक आंकडेवारी आढळते. भारतापेक्षां महाराष्ट्रांतील औद्योगिक विकासाचें प्रमाण जास्त आहे असें यावरून दिसतें. (खाणी व कारखानेद्वारा मिळणारें उत्पन्न महाराष्ट्रांत पावपटीपेक्षां जास्त आहे तर भारतांत तें एकोणीस टक्केच आहे) महाराष्ट्रांत ६४ टक्के शेतकरी












वर्ग आहे तर भारतांत तो ७० टक्के आहे. महाराष्ट्रांतील दर डोई उत्पन्न २७८ रु. आहे तर भारतांत तें २५४ रु. आहे. अर्थात् यांतील बराच मोठा वांटा मुंबई शहराचा आहे हें लेखकांनीं नमूद केलेलें आहे.

महाराष्ट्रांतील विविध धान्यांचें उत्पादनाचें प्रमाण भारताशीं मिळतें जुळतें आहे. मात्र तांदुळाचें उत्पादन सोडल्यास इतर बाबतींत एकरीं उत्पादनाचा आंकडा महाराष्ट्रांत कमीच आहे. कांहीं गांवांच्या संशोधनाच्या आधारें सरासरी शेताचें क्षेत्र हें २१ एकर आहे असें म्हटलें आहे. अर्थात् याहि बाबतींत एकंदर महाराष्ट्राच्या दृष्टीनें या आंकड्यांचा फारसा उपयोग होईल असें वाटत नाहीं. पाणीपुरवठयाच्या बाबतींतील महाराष्ट्राची स्थिति असमाधानकारक आहे असेंच दिसून येतें.

दुसरा भाग हा आंतर्विभागीय भेद विषद करून सांगणारा आहे. लोकसंख्या, पिकें, पाणीपुरवठा, उत्पन्न, प्राणिसंपत्ति व सहकारी संस्था यांसारख्या विषयांसंबंधीं माहिती देणारीं लहानमोठीं पंधरा कोष्टकें या विभागांत भरलेलीं आहेत. कोंकणांत लोकवस्तीचें प्रमाण सर्वांत जास्त म्हणजे दर चौ. मैलास ३५८ असें आहे. मात्र शेतीवर अवलंबून असणाऱ्या वर्गाचें प्रमाण कोंकणांत इतर भागांपेक्षां जरा कमी आहे. कोंकणांतून मुंबईस येणारा बराच मोठा नोकरवर्ग हें याचें कारण असूं शकेल. शेतकरी वर्गामध्यें कूळ म्हणून काम करणाऱ्यांची संख्या कोंकणांत जास्त आहे ( ४४ टक्के ) व इतर विभागांत ती फारच कमी म्हणजे ७-८ टक्के आहे. या उलट रोजगारीनें काम करणाऱ्या मजुरांचें प्रमाण कोंकणांत ७ टक्के आहे तर विदर्भांत तें ३८ टक्क्यांहून अधिक आहे.

महाराष्ट्रांतलें सुशिक्षितांचें प्रमाण २१ टक्के आढळतें. मराठवाडा विभागांत तें सर्वांत कमी म्हणजे ९ टक्के आहे. कोंकणांत पडीक जमिनीचें प्रमाणहि सर्वांत जास्त म्हणजे १८ टक्के आहे. अर्थात् तेथील लागवडीचें माणशी प्रमाणहि सर्वांत कमी आहे. कोंकणांत लोखंडी नांगरांचें प्रमाण जवळजवळ शून्यच आहे असें दिसून येतें. यावरून कोंकणचा प्रदेश शेतीचे बाबतींतहि सर्व दृष्ट्या कसा मागासलेला आहे याचा प्रत्यय येईल. याउलट देश व मराठवाडा येथें लोखंडी नांगरांचें प्रमाण बरेंच असल्यामुळें तेथें शेतीसुधारणेबाबत थोडीफार प्रगति झाली आहे असें दिसून येईल.

महाराष्ट्रांतील पिकांचे गटवारीवरून असें दिसून येईल कीं, त्याबाबतींतहि फारशी विविधता आढळून येत नाहीं. सत्तर टक्के पिकें हीं अन्नधान्यें असतात व इतर पिकांचें प्रमाण त्यामानानें बरेंच कमी आहे. पाणी पुरवठ्याचे बाबतींत असें दिसून येतें कीं बहुंशी पाणीपुरवठा हा विहिरींपासूनच होत आहे. मात्र विदर्भांत तलावांपासून मिळणाऱ्या पाण्याचें प्रमाण ६४ टक्के आहे. सरकारी कालव्यांच्या बाबतींत कोंकणांत पूर्णपणें दुर्लक्ष झालेलें आहे हा मुद्दा महत्त्वाचा आहे. याउलट कोंकणांतील खाजगी कालव्यांचें प्रमाण सर्वांत जास्त आहे असें दिसून येईल. मात्र एकंदर महाराष्ट्राच्या सर्वच विभागांतील पाणीपुरवठ्याची व्यवस्था असमाधानकारक आहे असेंच आढळून येईल. येथील कमी उत्पादनाचें हें एक महत्त्वाचें कारण असूं शकेल.

विदर्भ व मराठवाडा ह्या दोन विभागांतील अन्नधान्याचें उत्पादन अधिक असल्यामुळें नवीन महाराष्ट्रराज्याला त्याबाबतींत मोठा आधार आहे, असें लेखकांचें म्हणणें आहे. सहकारी संस्थांचें प्रमाण देश व मराठवाडा यांसारख्या कुळांची संख्या कमी असलेल्या भागांत जास्त आहे. या उलट कोंकण व विदर्भ या ठिकाणीं तें कमी भरतें. एकंदरीत दृष्ट्या कोंकण हा सर्वांत मागासलेला विभाग आहे हें दृष्टोत्पत्तीस येतें. येथील बरीच जमीन लागवडीस आणण्यासारखी आहे व त्या अनुरोधानें प्रयत्न होण्याची आवश्यकता आहे. तसेंच कालव्यांच्या बाबतींतहि सरकारनें लक्ष घालणें जरूर आहे. मराठवाड्यांत शेतीवर अवलंबून असणारांचें प्रमाण सर्वांत जास्त म्हणजे ८६ टक्के आहे. येथील सुशिक्षितांचें प्रमाण सर्वांत कमी आहे; मात्र सहकारी संस्थांची संख्या सर्वांत जास्त आहे. विदर्भ व देश हे धान्य उत्पादन, लागवडीचें प्रमाण वगैरे सर्व दृष्टीनें जास्त समृद्ध वाटतात.

या लेखाच्या तिसऱ्या व महत्त्वाच्या भागामध्यें शेतीविषयक धोरणासंबंधानें कांहीं विचार मांडलेले आहेत. महाराष्ट्रांतील पाणीपुरवठ्याचें प्रमाण व इतर परिस्थितीचा आढावा घेतला असतां भविष्यकाळांत शेतीचें उत्पादन फारसें आशादायक असेल असें लेखकांस वाटत नाहीं. व उज्वल भविष्यासाठीं महाराष्ट्रानें औद्योगीकरणाचीच कांस धरली पाहिजे असें त्यांचें म्हणणें आहे. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेमध्यें खाणी व







कारखाने यांवर १८·५ टक्के खर्च योजिला होता तर महाराष्ट्रामध्यें हें प्रमाण फक्त ४·१ टक्के आहे. अशा तऱ्हेनें चुकीच्या मार्गानें जाणारीं पावलें वेळींच रोखून त्यांना योग्य तें वळण लावणें अत्यन्त आवश्यक आहे.

नागपूर काँग्रेसमध्यें झालेले ठराव व त्यानंतर देशाच्या नियोजनामध्यें त्यांचा केलेला अंतर्भाव यांच्या मूलभूत तत्त्वांविषयीं सहसा कुणाचें दुमत होणार नाहीं असें सांगून त्यांतील दोन मुद्यांविषयीं — एक म्हणजे जमिनींवरील कमाल क्षेत्रमर्यादेबद्दल व दुसरा सहकारी शेतीबद्दल — मात्र लेखकद्वय साशंक आहेत. केवळ समाजवादी मूल्यांच्या विचारांतून त्यांचा उद्भव झाला असला तरी उत्पादन दृष्ट्या अर्थशास्त्राच्या निकषावर घासून पाहतां त्यांतील पितळ उघडें पडतें असें त्यांचें म्हणणें आहे. समाजवादी रचनेच्या रोखानें आर्थिक नियोजन करीत असतां या दोन मुद्यांवर मात्र संघर्ष निर्माण होतो.

जर सर्वांना जमीन वांटून द्यावयाचें ठरवून समविभागणीचें तत्त्व आचरलें तर कमाल क्षेत्रमर्यादा फार कमी म्हणजे पंधरा एकरांवर आणून ठेवावी लागेल. मात्र याचे परिणाम उत्पादनावर प्रतिकूल होतील असा त्यांचा इशारा आहे. कारण त्यासाठीं आधीं असलेल्या मोठ्या जमिनींचे तुकडे करावे लागतील. शिवाय खेड्यांतील निर्वाहाकरितां राखून ठेवलें जाणारें धान्याचें प्रमाण वाढल्यामुळें प्रत्यक्ष बाजारांत येणारा माल हा कमी होईल. साम्यवादी देशांत यांतूनच संयुक्त शेतीचा (Collective Farming) पर्याय निघाला व तशा प्रकारच्या भीतीमुळेंच क्षेत्रमर्यादा ही वरील पातळीची असावी असें लेखकांचें मत आहे. पण असें केलें असतां सर्वांस वांटावयास जमिन पुरणार नाहीं हें निश्चित. अशा रीतीनें कोणतेंच उद्दिष्ट साध्य न होतां उत्पादनावर प्रतिकूल परिणाम होऊन परिस्थिति जास्त बिघडेल अशी भीति त्यांनीं व्यक्त केली आहे.

जमिनीच्या क्षेत्रांमध्यें समानता आणण्याचा प्रयत्न करण्यापेक्षां तोच परिणाम सरकारी करयोजनाद्वारा जास्त सुलभ व सुखावह आणि आर्थिक दृष्ट्या सुयोग्य तऱ्हेनें होईल. शेतीविषयक उत्पन्नांवर कर बसविल्यानें सरकारकडे जास्त पैसा जमा होईल; विषमता कमी होईल व उत्पादनांवर प्रतिकूल परिणाम होणार नाहीं. मुंबई राज्याच्या कमालमर्यादाविषयक कायद्यामध्यें अशा तऱ्हेनें उरलेली जमीन ही सहकारी शेती संस्थांना द्यावी असा जो उल्लेख आहे तोहि योग्य नाही. त्यापेक्षां वैयक्तिक रीत्या या जमिनी वांटल्या गेल्या तर जास्त फायदेशीर होईल असें लेखकाचें म्हणणें आहे. यादृष्टीनें पाहिलें असतां महाराष्ट्रांतील सहकारी शेतीविषयींचे दाखले हे असमाधानकारकच असल्याचें दिसून येईल; व खऱ्याखुऱ्या अर्थानें सहकारीसंस्था फार थोड्या असून उत्पादनाच्या दृष्टीनेंहि परिस्थिति असमाधानकारकच असलेली दिसेल.

कमालमर्यादा विषयक धोरणानें जागांच्या मर्यादा कमी होतील तर सहकारी शेतीमध्यें क्षेत्रमर्यादा वाढविण्याचें धोरण आहे. अशा तऱ्हेनें या दोन गोष्टी परस्परविरोधी आहेत असा लेखकद्वयांचा सिद्धांत आहे. देशावरील व इतर शेताची सरासरी दहा एकरांहून अधिक आहे. परंतु कोंकणांतील प्रमाण मात्र तीन एकराच्या आसपासच आहे. तेव्हां या लेखकद्वयांच्या मतें अितर शेतीविषयक व्यवस्थांचे बाबतींत सहकाराचें तत्त्व अवलंबावें व प्रत्यक्ष उत्पादनाच्या बाबतींत मात्र त्यावर भर देऊं नये व त्याचें स्वरूपहि प्रायोगिकच असावें असें आहे.

तुकडे जोडीचें धोरण अनुसरून जमिनी अेकत्रित करण्याचा उपाय हा फार महत्त्वाचा आहे व त्या दृष्टीनें महाराष्ट्रानें अद्याप फारसा प्रयत्न केलेला नाहीं. या बाबतींत पंजाब राज्याचें उदाहरण घेण्यासारखें आहे. त्यायोगें विहिरी बांधणें, कुंपण घालणें यासारख्या अन्य अनेक गोष्टी करणें सोअीस्कर जातें. तिसऱ्या योजनेच्या काळामध्यें या प्रयोगाचा जास्तींत जास्त अवलंब महाराष्ट्रानें करावयास हवा आहे. जातांजातां शेवटीं कारभारविषयक गफलतींवर कोरडे ओढलेले आहेत. शेतीच्या उत्पादनामध्यें तांत्रिक सुधारणा व उत्पादन-वाढ यांना फार मोठें स्थान नसल्यामुळें बऱ्याचशा गोष्टी या दक्ष कारभारावर अवलंबून असतात व नवीन संशोधनाचें कार्य सार्वजनिक क्षेत्रांतील संस्थानीं करून त्याचा फायदा सर्व शेतकरीवर्गास देणें अगत्याचें आहे.

## शेतीविषयक विवेचनावरील अभिप्राय

प्राध्यापकद्वयांच्या या लेखांतील पहिल्या दोन आंकडेवारीविषयक भागांविषयीं जास्त लिहिण्याची गरज नाहीं. अर्थात् महाराष्ट्राबद्दलचे सरासरी आकडे जरी भारतापेक्षां जास्त आकर्षक वाटत असले तरी

त्यांतील बहुंश हा बृहन्मुंबअीचा असल्यामुळें उरलेल्या भागाबद्दल फारशी आशाजनक परिस्थिति दिसत नाहीं. दुसऱ्या भागांतील चौथ्या कोष्टकांत सुशिक्षित मागासलेल्या जातींतील लोक व वन्य जातींतील लोक अशी वर्गवारी अेकाच कोष्टकांत देण्याचें प्रयोजन समजत नाही व त्याचा परस्परसंबंधहि लागत नाही. वा त्यावरून कोणतेहि पर्याय काढलेले नाहींत. गुरांची संख्या कोंकणांत फार मोठी आहे असें म्हटलें आहे. परन्तु त्यांच्या जोपासनेस लागणारीं कुरणें व तत्सम अनुकूल परिस्थितीच्या अभावीं त्यांचा दर्जा मात्र इतरांपेक्षां निकृष्ट आहे. या लेखाच्या शेवटीं परिशिष्ट म्हणून कांहीं महत्त्वाच्या ठिकाणांचें पर्जन्यवृष्टीचे आंकडे उगीचच दिलेले आहेत! तसेंच यांतील कांहीं कोष्टकें हीं जास्त सुस्पष्ट असावयास हवीं होतीं असें वाटतें!

शेतीच्या धोरणविषयक घेतलेल्या आक्षेपांमध्येंहि फारसा मुद्देसूदपणा वा सविस्तर व सुस्पष्ट विवेचन दिसून येत नाही. कमाल क्षेत्रमर्यादा वरच्या पातळीवर ठेवल्यामुळें व्यक्तिगत अतिरिक्त संचयास आळा बसेल यांत शंकाच नाहीं. या योजनेमुळें सर्वांस वांटावयास जमीन पुरेल असें सरकारलाहि वाटत नसेल. या धोरणान्वयें शेतीच्या क्षेत्रव्यवस्थेवर कांहीं नियंत्रण ठेवण्याचा उद्देश असावा व तें उचितच ठरेल. तसेंच कमाल मर्यादा पन्नास एकरांवर असेल तर महाराष्ट्रांत पन्नास एकरांच्या वर असणाऱ्या जमिनींचें प्रमाण, त्यांनीं दिलेल्या कोष्टकांच्या आधारावरूनहि फारच कमी भरेल असें दिसून येईल व त्यामुळें उत्पादनव्यवस्था विस्कळित होऊन विपरीत परिणाम होतील अशी त्यांनीं व्यक्त केलेली भीतीहि निराधार वाटते. विशेषतः यांतून संयुक्त शेती निर्माण होईल ही शंका तर निर्मूलकच आहे.

सहकारी शेती हा नवीन प्रयोग आहे आणि कोणत्याहि नवीन प्रयोगांत येणाऱ्या अडचणी याबाबतींतहि आल्या तर त्यांत नवल वांटण्याजोगें कांहींच नाहीं. तसेंच सुरवातीचे प्रयोग फसले वा असमाधानकारक झाले तर त्यावरून ही तत्त्वप्रणालीच चूक आहे व हें धोरण घातुक आहे असें म्हणणें योग्य ठरणार नाहीं. सहकारी शेती यशस्वी होण्यासाठीं योग्य ती पार्श्वभूमि निर्माण करणें आवश्यक आहे व त्यानंतर योग्य ते अनुकूल परिणाम दिसून आल्याशिवाय राहणार नाहींत. विशेषतः कोंकणासारख्या भागांतील शेतकरी अत्यंत लहान लहान शेतें कसतांना दिसतात. अशा ठिकाणीं सुयोग्य तऱ्हेनें व त्यांना आर्थिक फायदेशीरपणा पटवून देऊन जर कार्य सुरू केलें तर उत्पादनावर निश्चित अनुकूल परिणामच होईल. शेतकऱ्यांचें व्यक्तिगत दारिद्र्य व म्हणून अद्यावत् साधनांची अनुपस्थिति या गोष्टी लक्षांत घेतां सहकारी शेती हा एकच तरणोपाय दिसतो. त्यायोगें बंधारे, कुंपणें, व्यवस्था वगैरे बाबतींत होणारा अनाठायीं व अमाप खर्च टळला जाईल व उत्पादनहि वाढेल. मात्र तत्पूर्वी येथील लोकांना या गोष्टीचें महत्त्व पटवून देऊन योग्य ती पार्श्वभूमि निर्माण करणें आवश्यक आहे.

आपल्याकडील शेतीविषयक अडचणी ह्या मुख्यतः संघटणविषयक असल्यामुळें कर्तव्यदक्षता व कार्यक्षमता यांचे द्वारा उत्पादनांत वाढ करणें हाच एक महत्त्वाचा मार्ग आहे. औद्योगिक कारखान्यांच्या वाढीसाठी भांडवलाची अत्यन्त गरज असल्यामुळें व त्यायोगें आर्थिक प्रगति त्वरित होत असल्यामुळें शेतीविषयक योजनांवर जास्त पैसा खर्च करण्यापेक्षां शेतीच्या लागवडीचा कारभार जर सुधारला तर वर निर्देष केल्याप्रमाणें उत्पादनवाढ होईल; त्यासाठीं सहकारी शेतीच्या तत्त्वांचा अवलंब योग्य तऱ्हेनें, योग्य दिशेनें, योग्य वेळीं व योग्य प्रमाणांत केला पाहिजे एवढेंच!

कमालमर्यादाविषयक धोरण व सहकारी शेती या दोन्ही गोष्टी परस्परविरोधी आहेत असा लेखकांचा दावा आहे. परन्तु वर निर्देष केल्याप्रमाणें कमालमर्यादा जर वरच्या पातळीवर ठेवली तर फार थोड्या जमिनींचा त्याबाबत संबंध येणार आहे व बव्हंशी ज्या जमिनींचें क्षेत्र फार लहान आहे अशाच जमिनी जास्त असल्यामुळें सहकारी शेतीच्या द्वारा त्यांतील अत्यंत लहान तुकड्यांचें एकत्रीकरण केलें असतां आर्थिक दृष्ट्या उत्पादनाबाबत फायदाच होईल व खर्चाची थोडीफार बचत होईल. अशा तऱ्हेनें या दोनहि गोष्टी एकाच वेळीं अवलंबणें सहज शक्य आहे. अर्थात् प्रथम त्याचें स्वरूप प्रायोगिक रहावें व नंतर अनुभवानें, हळू हळू योग्य त्या सुधारणांना वाव मिळावा हें रीतसरच आहे.

तुकडे जोडीचें महत्त्व निश्चित अधिक आहे व त्या दृष्टीनें महाराष्ट्र राज्यानें जोरांत वाटचाल करणें








आवश्यक आहे याबाबतींत कोणाचेंहि दुमत होणार नाहीं. तसेंच वर सांगितल्याप्रमाणें दक्ष कारभार हें शेतीसुधारणांचें महत्वाचें अंग आहे याबद्दलहि संशय नाहीं. मात्र सहकारी शेती वा कमालमर्यादा यांबाबत एवढा बाऊ न करतां आस्ते आस्ते या सुधारणा कशा पचवितां येतील यासंबंधींचा विचार करणें अधिक श्रेयस्कर होईल. याबाबत करद्वारा उत्पन्न विभागण्याच्या पर्यायामुळें मात्र कार्य न साधतां उलट उत्पादनावर अनिष्ट परिणाम होतील. शिवाय नवीन करांबाबतच्या तांत्रिक अडचणीहि अनेक असतात त्या वेगळ्याच. आर्थिक दृष्ट्या उपयुक्त ठरणाऱ्या सुधारणा एकंदर धोरणामध्यें चपखल बसतील अशा तऱ्हेचा लवचिकपणा सर्वसाधारण धोरणामध्यें असावयास हवा.

एकंदरीत पाहतां या परिसंवादाबद्दल सांगावयाचें झाल्यास त्यांतील लेखांनीं थोडासा अपेक्षाभंगच केला असें म्हणावें लागेल. यापैकीं अेक लेख हा त्रुटित स्वरूपाचा असून त्यांत कोणताहि महत्त्वाचा असा नवीन वा विशेष मुद्दा प्रकर्षानें हाताळलेला नाहीं. त्यांतील कांहीं मुद्दे विस्तारानें दुसऱ्या लेखांत आढळतात तर कांहीं मुद्यां विषयीं तीव्र मतभेद वाढतो. उद्योगधंद्यांच्या विकेंद्रीकरणाविषयींचा लेख त्यांतल्यात्यांत चित्तवेधक आहे. शेतीविषयक लेखांतील बराचसा भाग माहितीपूर्ण आंकडेवारीनें भरलेला आहे. परन्तु कमाल क्षेत्रमर्यादा व सहकारीशेती यांविषयीं घेतलेले आक्षेप हे फारसे पायाशुद्ध वाटत नाहींत. नवीन कायदे वा नवीन तत्त्वें हीं सामावून घेण्यासारखी परिस्थिती निर्माण केल्यानंतर व त्या बाबतींत योग्य तो लवचिकपणा समाजव्यवस्थेमध्यें कायम ठेवल्यानंतर या गोष्टी फारशा दुर्लभ नाहींत हें दिसून येईल.

या लेखांमध्यें कोंकणरेल्वेसारख्या गाजलेल्या प्रश्नांचा अनुल्लेख, नवीन संशोधनात्मक कार्याच्या माहितीविषयींची अनास्था या गोष्टी जाणवतात. तसेंच आर्थिक प्रश्न, भांडवल व उद्योगधंद्यांतील धडाडीं-विषयींच्या योजना, करव्यवस्था, राज्यसरकारचें अर्थकारण, पाणी पुरवठ्याविषयींचा प्रश्न, केंद्रीय नियोजनांतील राज्यसरकारचा वांटा व महत्त्व या व यांसारख्या अितर ज्वलन्त प्रश्नांचा ऊहापोह नवमहाराष्ट्राच्या संदर्भात होणें आवश्यक आहे व त्यादृष्टीनें अर्थशास्त्र, राज्यशास्त्र व विज्ञान रसायनशास्त्र यांसारख्या भिन्नभिन्न शास्त्रांतील अधिकारी व्यक्तींचा परिसंवाद घडवून आणून नवमहाराष्ट्राच्या भावी वैभवाचें चित्र रेखाटणें आवश्यक आहे.

---














श्री. रा. वि. अधिकारी

# माणगांव तालुक्यांतील गांवांचीं नांवें : ३ :

प्रत्येक मनुष्याला स्वतःच्या गांवाबद्दल अभिमान वाटत असतो. आणि त्यामुळें आपलें गांव चांगल्या विशेषणांनीं अलंकृत करणें हा सहजस्वभावच आहे. त्याची प्रचीति या गांवांच्या नांवांतहि येते. या तालुक्यांत दहा गांवांचीं नांवें विशेषण युक्त आहेत. महागांव, महादपोली, महुरे आणि मूर हीं चार गांवाचीं नांवें आपली महानता आपल्या नांवानें प्रकट करीत आहेत. महान् गांव, महान् पल्ली, महत् ऊर आणि महान् ऊर अशा अर्थाचीं तीं गांवांचीं नांवें आहेत. यांत एकाला गांव, एकाला पोली आणि दोघांना ऊर हीं ग्रामत्व बोधक पदें लागलीं आहेत व मूर या शब्दांत हाचा पूर्ण लोप झाला आहे व प्रथमाक्षरांतील मकारांत उकार मिळवितांना अ+उ=ओ न होतां ऊच राहिलें आहे. व महादपोली या शब्दांत महान् याचे रूप महाद् असें झालें आहे. अनुनासिकाऐवजी त्याच वर्गांतील तिसरें व्यंजन असें कांहींवेळां येतें. पुष्कळवेळां अनुनासिकाजवळील व्यंजन लोप पावतें असें आढळून येतें. तसेंच कांहींवेळां तें नसलेलेंहि येतें असें दिसतें. महुरे हें गांवाचें नांव कदाचित् मोहाच्या झाडावरूनहि पडलें असण्याचा संभव आहे. पण त्यापेक्षां तें विशेष युक्त धरणेंच अधिक सयुक्तिक आहे असें मला वाटतें.

चन्नाट हें गांवाचें नांवहि याच वर्गांतील आहे. चन्न या शब्दाला आट हें ग्रामत्वदर्शक पद लागून हें नांव तयार झालें आहे. चन्न हा शब्द डोळयासमोर येतांच चन्नबसवेश्वर, कित्तूरची राणी चन्नम्मा वगैरे नांवें डोळयांसमोर उभी राहिलीं आणि हा शब्द कानडी असल्याचें लक्षांत येऊन त्याच्या अर्थाविषयीं माझ्या कानडी स्नेह्यांकडे चौकशी केली. तेव्हां चन्न म्हणजे सुंदर असें कळून आलें आणि अट्ट म्हणजे डोंगरपायथ्याची सपाटजागा, चौक वगैरे. यावरून सुंदरगांव असा त्या नांवाचा अर्थ झाला. मांगरूळ हें गांवाचें नांव मांग या जातीवरून पडलेलें नसून मंगळऊर यावरूनच वर्णविपर्यय होऊन तयार झालेलें आहे असें चिंतनाअंतीं आढळून आलें. मंगळूर हें दक्षिणकानडा जिल्ह्यांतील गांव, गुजरातेंतील (सौराष्ट्रांतील) मांगरोळ बंदर वगैरे याचीं उदाहरणें पाहावयास सांपडतात. वरळ हें गांव वर म्हणजे श्रेष्ठ हें विशेषण कथाग्रामत्वबोधक पदानें बनलें आहे. पढवण आणि वाढवण हीं वण या ग्रामत्त्वदर्शक पदानें बनलेलीं गांवांचीं नांवेंहि अशींच विशेषण युक्त आहेत. पट्ट या संस्कृत शब्दावरून पढ हा शब्द झाला असावा तर वाढलेलें (वर्धित) या अर्थी वाढ हा शब्द आला असावा असें वाटतें.

उणेगांव हें एका गांवाचें नांव आहे. कोणती उणीव आढळल्यामुळें लोकांनीं या गांवाचें असें नांव ठेवलें कोणजाणें ? कीं मानवीजीवन अपूर्ण असल्यामुळें तें सदैव उणेंच असावयाचें असा साक्षात्कार तेथील लोकांना झाला होता कीं काय हेंहि सांगतां येत नाहीं. कदाचित् आपला विनय प्रकट करण्यासाठीं ठाकरसी शेटनीं आपल्या प्रासादाला पर्णकुटी असें नांव दिलें आहे तसेंच या गांवच्या लोकांनींहि असें नांव दिलें असावें. हे सर्व तर्क मजबूत पायांवर उभे आहेत. आपल्या गांवाला महागांव म्हणून मिरवणारे लोक जर सापडतात. तर आपल्या गांवाला उणेगांव म्हणणारे लोक निघाले तर त्यांत नवल कोणतें ? अशा तऱ्हेनें दहा विशेषण युक्त ग्रामनामांचा विचार झाला.

### रंगवाचक व संख्यावाचक नांवें

कांहीं गांवांच्या नांवांत वर्ण बोधकत्त्व आहे. अशीं गांवें फक्त तीनच आहेत. तांबडी हें गांव आपल्या परिसरांतील मातीचा तांबडा रंग निर्देशित करतें. पण निळघूण आणि निळज हीं गांवें आपल्या नांवांतून निळा रंग सुचवितात तो कुठला हें लक्षांत येत नाहीं. तसेंच यांतील निळज या नांवांत ज हें ग्रामत्त्वबोधक पद तें बनलें आहे हें ठीक. पण निळघूण या नांवांत ऊण हें ग्रामत्त्वदर्शक पद लागतांना मध्यें जो घकार








आला आहे तो कोठला हें कांहीं लक्षांत येत नाहीं. रातवड या गांवांतील रात हें पदहि राता म्हणजे तांबडा रंग दाखवीत आहे. पण तो वडाचा रंग (फळाचा वा कोवळया पानांचा) असावा त्या प्रदेशाचा नव्हे. आणि सोनसडे याबद्दल मागें लिहिलेंच आहे. पण या नांवांतील रंगवाचक पदें प्रधान नसल्यामुळें त्यांचा समावेश वर्णबोधक गांवांत केला नाहीं.

कांहीं गांवांचीं नांवें संख्याबोधक आहेत. अशीं गांवें फक्त चार आहेत. पांचघर हें उघडच पाच या संख्येचें बोधक आहे. सुरुवातीला तेथें फक्त पांचच घरें असतील आणि त्यामुळें त्याच नांवानें त्याचा उल्लेख होतां होतां तेंच नांव कायम राहिलें असावें असें वाटतें. पाचोळे हें गांवाचें नांव संख्यावाचक कीं पाचोळा म्हणजे सुखीपानें–जसें पालापाचोळा – यावरून पडलें आहे याबद्दल शंका येते. पण यांतील अंत्यपद ओळें हें पल्लीवरून झालेल्या वली व ओली या पदांशी जवळचें वाटतें. व त्यामुळें ग्रामत्वदर्शक धरून त्याचा संख्यावाचक गांवांत समावेश केला आहे. लाखपाले या गांवांतील पालें हें पद ग्रामत्वबोधक आहे पण पहिलें लाख हें पद जसें संख्याबोधक आहे असें वाटतें तसेंच पूर्वी तेथील जंगलांत लाख सापडत असावी आणि त्या संदर्भानेंहि तें झालें असण्याचा संभव आहे. किंवा लाखणें म्हणजे चिकटणें या अर्थावरून टेमपालें व वडपाले या दोन्ही गांवांना चिकटलेलें गांव तें लाखपाले असेंहि असण्याचा संभव आहे. पण अशीं अनुमानें निघालीं तरी लाख शब्द ऐकतांच प्रथम तिचें संख्यावाचकत्वच ध्यानांत येतें म्हणून या नांवाचा संख्यावाचकांत समावेश केला आहे.

आतां राहिलें चौथें गांव पहेल! हें नांव पहिलें या शब्दाचा अपभ्रंश होऊन तयार झालें असलें पाहिजे असा माझा विश्वास आहे. कारण तेथील पांच गांवांच्या समुदायाला पांचपाले अशी संज्ञा आहे आणि पहेल खेरीज बाकीचे गांव १ खांडपाले, २ टेमपाले ३ लाखपाले, ४ वडपाले या चारी गांवाच्या नांवांपुढ पालें हा शब्द (पद) आहे. फक्त पहेल पुढेंच तो नाहीं. पण तेथील जमिनीची भारीप्रत, खलाटींतील पावसाच्या माण्याचा निचरा करण्याच्या सोयी वगैरे पाहतां तेथेंच पहिल्यानें वस्ती झाली असावी असें वाटतें. पहिलें पालें असा त्याचा पूर्वी उल्लेख होत असावा. पण पुढें कालांतरानें पालें हें पद गळून जाऊन पहिले शब्दाचा पहेळ असा अपभ्रंश होऊन तेंच नांव रूढ आणि सरकारमान्यहि झालें असावें असा माझा समज आहे.

कांहीं गांवांचीं नांवें त्यांच्या विशिष्ट उपयोगावरून पडलीं असल्याचें दिसून येतें. अशीं गांवें थोडींच आहेत. पेणे म्हणजे मुक्काम यावरून घाटावरून खाडीकांठच्या किंवा समुद्रकांठच्या बंदराकडे बैलांवर लादून माल आणणारे व्यापारी आपला मुक्काम ज्यागांवीं करीत असत तें गांव पेण. अशा सार्थवाहांचा ज्या क्षेत्रांत (शेतांत) तळ पडत असे तें गांव तळाशेत. आणि चरईखुर्द, चरई बुद्रुक या गांवांच्या नांवावरून तेथें कृषिसंस्कृतीचें आगमन बऱ्याच उशिरानें झालें असावें असें वाटतें. कृषिसंस्कृतीच्या आधीं गोपाल संस्कृति येथें सर्वत्र असणें साहजिकच; पण इतर गांवांनी कृषिसंस्कृतीचा स्वीकार केला तरी या गांवांतील गोपाल संस्कृतीचे लोक येथील जमिनीचा उपयोग केवळ गुरांच्या चराईकरतां करीत असावे असें या नांवांवरून दिसतें. आणि त्या भागांत गवळयांची वस्तीहि बरीच आहे.

कांहीं गांवांचीं नांवें निरनिराळया अवयवांच्या नांवांवरून पडलेलीं आहेत असें दिसून येतें. नामकरण करणाराला अवयवांचें गांवाशी कोणतें साधर्म्य वाटलें होतें कोण जाणें! अशीं गांवें फार नाहींत पण निदान पांच तरी आहेत. पोट या अवयवावरून नेर हें पद णेर होऊन झालेले पोटणेर, तर खांदा या अवयववाचक शब्दाला आड हें पद लागून झालेलें खांदाड, हातावरून हातकेली–हातकेलींत एली हें पद ग्रामत्वबोधक आहे व हातक हें पूर्वपद हस्तक या शब्दावरून झालेलें दिसतें–आणि मुठीवरून झालेलें मुठवली (या नांवाचीं दोन गांवें आहेत. एक मुठवली तर्फ तळे आणि दुसरें मुठवली तर्फ निजामपूर). धान्यवाचक गांवांच्या यादींत दिलेलें मुगवली हें गांवहि कदाचित् मुखपल्ली या शब्दावरून झालें असण्याचा संभव आहे.

## अवयववाचक व शस्त्रवाचक नांवें

पण हा अवयवांवरून पडलेल्या नांवांचा वर्ग संशयातीत मात्र नाहीं. त्यांच्या बाबतींत तेवढ्या मगंदुराचीं दुसरीं अनुमानें सुचतात. फक्त मुठवली या







नांवाचा मात्र अपवाद केला पाहिजे. आतां हेंच पहाना पोटणेर हें गांव पूर्वी दुसऱ्या कोठल्या तरी गांवाच्या पोटांत म्हणजे अंतर्भूत वसलें असल्यामुळें त्याचें असें नांव पडलें असणेंहि शक्य आहे. तसेंच खांदाड हें गांवाचें नांव त्या गांवीं केव्हांतरी झाडाचें मोठें थोरलें खांदाड पडून राहिलें असल्यामुळेंहि पडलें असणें शक्य आहे. कारण तें खांदाड हीच त्या गांवाला ओळखण्याची मोठी थोरली खूण होऊन बसली असावी. आणि हातकेळी हें गांवाचें नांवहि हाटक म्हणजे सोनें या शब्दाचें हातक असें रूप होऊन त्याला एळी हें पद लागून झालें असण्याचा पुष्कळसा संभव आहे. आणि मुखपल्ली ही मुखपल्लीहि असण्याचा तेवढाच संभव आहे. हें लक्षांत घेतलें पाहिजे.

गांवांचीं नांवें कोणी मुद्दाम ठेवलीं आहेत असें नाहीं. जीवनांतून तीं त्याच्या ओघांत निर्माण झालेलीं आहेत. त्यामुळें जीवनाच्या विविध अंगांचें आणि विशालतेचें त्यांतून दर्शन व्हावें हें साहजिकच आहे. जीवनांत आपल्याला लागणाऱ्या वस्तूंवरूनहि कित्येक ग्रामनामें तयार झालीं आहेत. मानवाचें इतर प्राण्यांहून वेगळें असें वैशिष्ट्य म्हणजे तो शस्त्र वापरूं शकतो. तेव्हां शस्त्रांच्या नांवांवरून गांवांचीं नावें पडावीं हें साहजिकच आहे. भाला या शस्त्रावरून झालेलें भालें हें एक गांवाचें नांव आहे. तसेंच शस्त्राघातापासून बचाव करण्यासाठीं ढाल वापरतात त्यामुळें शस्त्राबरोबर तीहि आलीच– ढालीवरून झालेलें ढालघर या नांवाचेंहि एक गांव आहे. धनुष्य हें मानवाचें एक प्राचीन काळांतील प्रभावी शस्त्र होतें. सर्व शस्त्रविद्याच धनुर्वेद या नांवानें ओळखली जात असे एवढा धनुष्याचा प्रभाव या देशांत होता. तेव्हां धनुष्यावरून झालेलें नांव पाहिजेच : तसें एक गांव आहे. तें चापडी. धनुष्याचा प्रतिशब्द चाप त्याला डी हें ग्रामत्वबोधक पद लागून तें नांव तयार झालें आहे. मला प्रथम असें वाटलें होतें कीं चापडा या नांवाचा एक सरड्याच्या वर्गांतील प्राणी या भागांत सांपडतो. त्याच्यावरूनच हें नांव पडलें असावें. पण महाड तालुक्यांतमुद्धां चापगांव नांवाचें एक गांव आहे; तसेंच हेंहि चाप म्हणजे धनुष्य या शस्त्रावरूनच झालें असावें असें निश्चित केलें. असो !

भाला, धनुष्य वगैरे शस्त्रें प्रसंगीं प्राणघातसुद्धां करूं शकणारीं आहेत पण चाबूक अथवा कोरडा हें शस्त्र कांहीं प्राणघातक नाहीं. उपयुक्त मात्र आहे. या चाबकाचा संस्कृत प्रतिशब्द जोकशा त्याचें रूप कशे होऊन त्याला णे ग्रामत्वबोधक पद लागून झालेलें कशेणे नांवाचें एक गांव या तालुक्यांत आहे. एवढेंच नव्हे तर गवत अथवा धान्य कापावयासाठीं वापरण्याचें हत्यार विळा हेंहि विळें या ग्रामनांवामुळे चिरस्थायी केलें आहे.

## खांबवली आणि मेढें

खांबवली आणि मेढें हीं दोन गांवांचीं नांवें एकाच अर्थाचीं आहेत. पहिल्यांत वली हें ग्रामत्व बोधक पदलागलें आहे; दुसरें नुसतें अंत्य अकार एकारांत रूपांतरीत होऊन झालें आहे. खांब आणि मेढ हीं दोन्हीहि घराला लागणाऱ्या एकाच वस्तूचीं नांवें आहेत. अशीं घर वा घराच्या अंगभूत वस्तू यावरून पडलेलीं ग्रामनामें या तालुक्यांत आढळून येतात. उदाहरणार्थ : घरावरून घरोशी तर भिंतींवरून भिंताड. खांब आणि मेढ तर आलीच आहे आणि शस्त्रांवरून झालेल्या गांवांत आलेलें भालें हें गांव भाल म्हणजे तुळई या अर्थानें मुद्धां आलें असण्याचा संभव आहे. घराला भिंती आल्या कीं त्यांत कोनाडे ठेवावयाला हवेच. कोनाड्यांना येथील लोक देवळी म्हणतात. दैवतवाचक गांवांत दिलेलें देवळी हें गांव कोनाडा या अर्थानें पडलें नसेलच असें म्हणतां येत नाहीं. पण या सर्वांच्या बाबतीत दुसरे तर्कहि मजबूत आहेत. एक खांबवली गांव सोडून इतर सर्व नांवांना दुसरे पर्यायी तर्क सापडतात. घरोशी हें गांव घर आणि ओशी हीं दोन ग्रामत्ववाचक पदें एकत्र होऊन झालें असण्याचाच अधिक संभव वाटतो. या गांवाच्या नांवाचें पूर्वपद अजिबाद नष्ट होऊन गेलें असावें असें वाटतें. तसेंच भालें हें शस्त्रावरून तर मेढें म्हणजे ध्रुवाची तारका यावरूनहि तें नाव पडलें असणें असंभवनीय नाहीं. आणि देवळी हें तर दैवतवाचक गांवांत घातलेलेंच आहे आणि भिंताड मुद्धां तेथील डोंगर, गांव आणि खाडी यांच्या मध्यें भिंतीसारखा पसरलेला असल्यामुळें भिंतीआड गेलेला गांव तो भिंताड असें जलमार्गानें येणाऱ्या जाणाऱ्या लोकांनीं नामकरण केलें असण्याचा पुष्कळसा संभव








आहे. फक्त खांबवलीच्या बाबतींत दुसरा तर्क संभवत नाहीं. मग तेथें आपला विजय दर्शविण्या-साठीं कोणी स्तंभ रोवून आपलें निशाण लावलें होतें कोणजाणें ?

## नांदवी आणि मांदाड

नांदवी हें गांवाचें नांव तेथें प्राचीनकाळीं नंद नांवाचा कोळी राजा राज्य करीत होता त्याच्या नांवा-वरून पडलें असल्याची आख्यायिका पुरार या गांवा-संबंधानें लिहितांना दिलीच आहे. पण नंद या नांवा-वरून हें नांव झालें असतें तर नंदवे अथवा नंदवी असें त्याचें रूप झालें असतें. तें नांदवी कां व्हावें हें समजत नाहीं. पण मग एक चांगला तर्क सुचला आणि मग समाधान झालें. नांदवी या गांवचे कुंभार हे प्राचीन रहिवासी असून तेथील मडकीं विशेषतः रांजण या भागांत फार पूर्वकाळापासून प्रख्यात आहेत. रांजणालाच नांद हा एक प्रतिशब्द हिंदी व मराठी या दोन्ही भाषेंत आहे. या नांद शब्दालाच वी हें ग्रामत्त्व-बोधक पद लागून नांदवी हें गांवाचें नांव तयार झालें असावें असें वाटतें आणि याला आणखी एक आधार आहे. मांदाड या नांवाचें एक गांव या तालुक्यांत आहे. मांद या शब्दाचा अर्थहि रुंद तोंडाचें भांडें, विशेषतः मातीचें, शेगडी (विस्तव ठेवण्याचें मातीचें पात्र) असा आहे. तेव्हां तेंहि रांजणाशी जुळतें आहे. त्याला आड हें ग्रामत्त्वबोधक पद लागून हें नांव तयार झालें असावें असें वाटतें. पण मांदाड या गांवीं कुंभारांची वस्ती मुळींच नाहीं, ही अडचण वाटते. पण मांदाडच्या शेजारच्याकडे या गांवीं मात्र कुंभारांचीच प्रमुख वस्ती आहे. कुडे आणि मांदाड हीं दोन्हीं गांवें राजपुरी खाडीच्या काठीं वसलेलीं आहेत. पण त्यांतल्यात्यांत मांदाड हें अधिक चांगलें बंदर असून तें म्हसले व मालाठे या दोन्ही जलमार्गांच्या नाक्यावर वसलेलें असल्यामुळें कुड्याच्या कुंभारांच्या वस्तु मांदाडा-सहि विक्रीस जात असतील आणि त्याचमुळें जलमार्गानें व्यापार करणाऱ्या सौदागरानीं त्या गांवाचें नांव मांदाड ठेवलें असावें. जसें तें मांदाड मांदवरून तसें नांदवी नांदवरून नांव पडलें असावें हें अधिक तर्कसंगत वाटतें. मांद या शब्दाचा दुसरा अर्थ खळयांतील धान्याची रास असा आहे पण तो अर्थ येथें अभिप्रेत असेल असें वाटत नाहीं.

## जीवन वैचित्र्याचीं गांवांच्या नांवांत उमटलेलीं प्रतिबिंबें

जीवन जसें बहुविध आहे त्याप्रमाणेंच त्याचा आविष्कारहि बहुविधतेनें होतो. या गांवांच्या नांवांतील बहुविधताहि पहाण्यासारखी आहे. शेतकरी शेतांत गुरें शिरूं नयें पण माणसाला मात्र जातां यावें म्हणून वाटेवर जें दुबेळक्याचें लाकूड बसवतो त्याला बेडें असें म्हणतात. अथवा गुरांच्या गोठ्यालाहि बेडें म्हणतात. त्यावरून झालेलें बेडगांव या तालुक्यांत आहे. तसेंच पीठावरून सई हें ग्रामत्व बोधक पद लागून झालेलें पिटसई हें गांवहि पहावयास सांपडतें. या पिटसईला लोकव्यवहारांत पिष्टई म्हणतात. तें रूप वर्णविपर्यय होऊन झालेलें असावें पण पिष्टई असें रूप घेतलें तरी पीठ आणि पिष्ट यांचा अर्थ एकच असल्यामुळें अर्थांत कांहीं बदल होत नाहीं. दही या शब्दावरून त्याला वली हें पद लागून दहिवली हें ग्रामनांव बनलें आहे. या नांवाचीं दोन गांवें आहेत एक गोवेले तर्फांत तर एक तळे तर्फांत. लोकव्यवहारांत हीं दोन्हीं गांवें ढवळी या नांवानें ओळखलीं जातात. होडीवरून पडलेलें होडगांव या नांवाचेंहि एक गांव आहे. होड या शब्दाचा दुसरा अर्थ पैज असा आहे. त्या अर्थानेंहि तो शब्द या गांवाच्या नांवांत आला असण्याचा संभव आहे. कोणी, कुणाशीं आणि कशाबद्दल पैज मारून तो गांव केव्हां मिळवला होता कीं काय ? कोणजाणें. शेतकरी एक आखूड आणि बिन बाह्यांचे अंगातलें वापरतात त्याला काचलें म्हणतात. त्यावरून तयार झालेलें काचलें या नांवाचें एक गांव आहे. कदाचित् कांच या शब्दाला लें हें ग्रामत्ववाचकपद लागूनहि हें गांवाचें नांव सिद्ध झालें असण्याचा संभव आहे. कारण लोखंडाचे कारखाने असलेल्या नांदवी पुरारपासून हें गांव नजीक आहे व तेथें कांचेचे कारखाने ( बांगड्यांचे ) असण्याचा संभव दृष्टीआड करतां येत नाहीं.

एका गांवाचें नांव आहे शिळीम. हें गांवाचें नांव कसें झालें असावें याबद्दल कांहीं बरेंच दिवस कल्पना येत नव्हती. कारण शिळेंबे म्हणजे शिबें या त्वचा-रोगावरून कोणी आपल्या गांवाचें नांव ठेवील असें वाटेना. पण मग असें स्मरलें कीं शिळीम गांवचें जें परंपरागत खोत घराणें आहे. त्यांचें नांव काझी चिळ-

मायी आहे. तळयाचे काझी ते तळयायी, म्हसळयाचे ते मसळाई, त्याअर्थी चिळीमचे काझी ते चिळमायी अशी कल्पना आली. पण हें चिळीम गांव आहे कोठें ? मग शिळीमचेंच मूळरूप चिळीम असलें पाहिजे हें त्यांतूनच अनुमान निघालें. आणि इतर वस्तूंवरून जशीं गांवांचीं नांवें पडलीं आहेत तशीं शेतकऱ्यांची आवडती व नित्योपयोगी वस्तु जी चिलीम तिच्यावरून एखाद्या गांवाचें नांव पडणें सहज शक्य आहे असें वाटून तोच तर्क निश्चित केला. आणि शिळीम हें चिळीमचें रूप आहे असा निर्णय मनाशीं घेतला.

## पूर्वकालीन घटनांची जपणूक

जीवनांत जशी विविधता आढळते तशी विचित्रताहि दिसून येते. तशी विचित्रता या गांवांच्या नांवांतहि आहे. एका गांवाचें नांव जिते असें आहे. अशी आख्यायिका सांगतात कीं, "उंबर्डीच्या विश्रामगड या किल्ल्यावरून एका सरदाराचा कांहीं तांत्रिक अपराधावरून कडेलोट केला होता. पण सुदैवानें तो न मरतां जिवंत राहिला. तो कड्यावरून ज्याठिकाणीं जिवंत म्हणजे जिता राहून पडला तेथील नजीकची वाडी जिते या नांवानें संबोधिली जाऊं लागली." जिवंतपणाचें निदर्शक असें हें जिते गांव आहे, तसेंच मृत्यूचें निदर्शक असें मढेगांव नांवाचेंहि एक गांव या तालुक्यांत आहे. ज्यावेळीं नांदवी हें गांव भरभराटलेलें होतें तेव्हां तेथील जें महास्मशान होतें तेथेंच मागून हें गांव वसलें गेलें आणि स्मशानांत वसलेलें गांव मढेगांव म्हणून ओळखलें जाऊं लागलें अशी आख्यायिका सांगतात.

कांहीं कांहीं गांवांचीं नांवें त्यांच्या इतिहासांतील महान् घटनांची जपणूक करीत आहेत. उदाहरणार्थ, थरमरी हें एका गांवाचें नांव आहे. केव्हांतरी कडाकोसळून तें थराआड गेलेलें होतें असें हें नांव सांगत आहे. हा कानडी भाषेंतील शब्द आहे. थर हा मराठी आणि कानडींत एकाच अर्थानें वापरतात पण पुढील शब्द जो मरी त्याचा अर्थ मागें असा आहे. तेव्हां थरमरी म्हणजे थराच्या आड गेलेलें गांव असा साहजिकच अर्थ झाला. सध्या या गांवीं कांहीं कातकरी लोकांचीं झोपडीं मात्र आहेत. पण ही वस्ती मागून झालेली असावी. मूळचें गांव कडा कोसळून गडप झालें असण्याचा पूर्ण संभव आहे.

असाच इतिहास सांगणारें दुसरें एक कोंडथरें नांवाचें गांव आहे. तेथें केव्हांतरी कडा कोसळून झालेल्या थरानें तें गांव कोंडून गेलें असावें व म्हणून त्याला कोंडथरें असें नांव पडलें असावें असें वाटतें. कदाचित् असाहि संभव आहे कीं तें स्वतंत्र गांव नसून दुसऱ्या कोठल्या तरी गांवाचा कोंड म्हणजे वाडी असावें व पुढें त्याला स्वतंत्रगांवाचा दर्जा प्राप्त झाला असावा. म्हणून लोकांनीं कोंड या थरांतील म्हणजे वर्गांतील गांव तो कोंडथरें असें त्याचें नामकरण केलें असावें असाहि संभव आहे. पण तसें धरलें तरी हें नांव या गांवाच्या इतिहासांतील महत्त्वाच्या घटनेची स्मृती सांभाळून ठेवीत आहे असें म्हणावयास कांहींच हरकत नाहीं.

नवशी हें एका गांवाचें नांव आहे. देवांवरून गांवांचीं नांवें पडलीं आहेत तसें देवांना नवस करतात मग नवसावरून एखादे गांवाचें नांव कां पडूं नये असा विचार येऊन हें गांवाचें नांव ठेवलें गेलें असावें असें वाटतें. पण यापेक्षां नव वशी म्हणजे नवीन वसलेलें गांव तें नवशी या नांवानें ओळखलें गेलें असेल हें म्हणणेंच अधिक समर्पक वाटतें. साजें हें गांवाचें नांवहि हाच आशय व्यक्त करीत आहे असें वाटतें. कारण साजे या शब्दाचा महाराष्ट्र शब्दकोशांतील अर्थ नवीन असा आहे. म्हणजे पूर्वी केव्हांतरी ओसाड पडलेलें हें गांव कोणीतरी नव्यानें वसवलें असावें तेव्हां त्याला लोक सहजच साजे या नांवानें संबोधूं लागले असतील. अथवा असेंहि शक्य आहे कीं त्या गांवांतील शेती, घरें वगैरे तेथील लोकांनीं श्रम करून सजवल्यामुळेंहि त्याला साजे असें नांव पडलें असावें.

सांगी हें गांवाचें नांव सांगी म्हणजे आमंत्रण या अर्थानें पडलें असावें असें वाटतें. सांगी या छोट्या गांवाशेजारीच उंबर्डी हें जुनें राजधानीचें गांव व श्रीचा म्हणजे लक्ष्मीचा वरदहस्त असलेलें शिरवली तर्फ निजापूर या गांवाच्या सांनिध्यांत वसलेलें आहे. या दोहोंपैकीं कुठल्यातरी गांवांतील प्रत्येक कार्यांत ज्या गांवीं सांगी करण्याची वहिवाट होती तो गांव सांगी या नांवानें ओळखला जाऊं लागला असावा. हा आमंत्रणाचा इतिहास त्या गांवाच्या नांवानें साक्षेपानें जतन करून ठेवला आहे.











कासेखोल हें गांवाचें नांव त्या गांवांत जमीनींची प्रतवारी झाली नव्हती तेव्हां ठेवलें गेलेलें असावें असें वाटतें. कारण कास या शब्दाचा अर्थ प्रतवारी न लावलेली जमीन असा आहे. ही घटना या नांवानें शतकानुशतकें जतन करून ठेवली आहे ही कौतुकास्पद गोष्ट आहे. कदाचित् कासा म्हणजे समुद्रांतील खडक या अर्थानें नांव पडलें असावें असें कोणी म्हणेल पण हा गांव समुद्रसांनिध्यांत नाहीं. तो राजपुरी खाडी जवळ मात्र आहे. पण प्राचीनकाळीं तेथपर्यंत समुद्र होता कीं काय हें सांगतां येत नाहीं. पण अशा तर्कापेक्षां पहिला तर्कच अधिक स्वीकारार्ह वाटतो.

पाटणूस हें गांवाचें नांव तेथें केव्हांतरी राजधानी असल्याचा इतिहास सांगत आहे. पट्टण म्हणजे राजधानीचें शहर. मूळ संस्कृत शब्द पत्तन. त्याचा पाटण हा अपभ्रंश झालेला सर्वत्र आढळतो. गुजरातमध्येंहि अनहिलपट्टण हा गांव पाटण याच नांवानें ओळखला जातो. या पाटण शब्दाला ऊस हें ग्रामवाचक पद लागून हें नांव झालें आहे. या प्रदेशांत प्राचीन काळीं डोंगर-कोळी जातीच्या भोजवंशीय राजांचीं छोटीं छोटीं राज्यें बऱ्याच ठिकाणीं होतीं. अशाच एखाद्या राज्याचें मुख्यस्थान येथें असण्याचा संभव आहे. शिवाय घाटावरील प्रदेशांतून जे मार्ग बंदरांपर्यंत जोडले गेले होते. अशा एका घाटाच्या पायथ्याशीच हा गांव वसलेला आहे. यामुळें घाटांतून येणाऱ्या सार्थवाहांना संरक्षण देऊन त्याच्या मोबदल्यांत त्यांच्याकडून करभार वसूल करून तेथें एखादें वैभवसंपन्न राज्य असणें अशक्य नाहीं. शिवाय तेथून ४।५ मैलांवर उंबर्डी येथें बराच काळपर्यंत डोंगर कोळ्यांचें वैभवसंपन्न राज्य नांदत होतें हें इतिहासावरून व तेथील भग्नावशेषावरून स्पष्ट दिसतें. जसें उंबर्डी हें एका घाटाच्या पायथ्याशीं आहे. तसेंच पाटणूस हें दुसऱ्या घाटाच्या पायथ्याशीं असलेलें गांव राजधानी असणें सहज संभवनीय आहे. पण पट्टण या संस्कृत शब्दावरून तें नांव झालेलें असल्यामुळें तेथील कारभारावर सुसंस्कृत लोकांची छाप पडलेली असल्याचें स्पष्ट होतें.

निजामपूर हें गांवाचें नांव निजाम नांवाच्या मुस्लीम वीर वा सत्ताधारी पुरुषाच्या नांवावरून पडलें असावें असें सकृद्दर्शनीं वाटतें. अहमदनगर, महंमदवाडी हीं अशा तऱ्हेचीं उदाहरणेंहि आहेत. पण निजाम नांवाचा कोणी प्रसिद्ध पुरुष त्या भागांत वा गावांत झालेला ऐकीवांत नाहीं. मग हें नांव कसें पडलें असावें ? हैद्राबादच्या निजामाचाहि तेथें कांहीं संबंध पोचत नाहीं. पण निझाम या शब्दाचा अर्थ ॲडमिनिस्ट्रेटर—कारभारी असा आहे. तेव्हां निजामपूर हें एका महालांचें मुख्य ठिकाण म्हणून बरेच वर्षें होतें. त्यामुळें महालाचा निझाम म्हणजे कारभारी जेथें राहतो त्या ठिकाणाचें नांव निजामपूर पडलें असणें असंभवनीय नाहीं

मशीदवाडी या गांवीं मशीद अथवा तत्समवास्तु औषधाला सुद्धां नाहीं मग हें त्या गांवाचें नांव कसें पडलें असावें याबद्दल असें वाटतें कीं मशीदवाडी हें गांव मानगड नांवाच्या किल्ल्याच्या पायथ्याशीं आहे. औरंगजेबाचा मुलगा शाहजादा अकबर बापाविरुद्ध बंड करून दक्षिणेंत संभाजी महाराजांच्या आश्रयाला आला होता तेव्हां तो या किल्ल्यांतहि कांहीं दिवस होता. त्यावेळीं किल्ल्याच्या पायथ्याशीं तो व त्याचे बरोबरचे लोक एखादा मांडव उभारून तेथें प्रार्थना करीत असावे व अशी तात्पुरती मशीद उभारलेलें गांव मशीदवाडी म्हणून ओळखलें जाऊं लागले असेल आणि मग तेंच नांव कायम झालें असेल असें वाटतें.

एका गांवाचें नांव राजीवली आहे. हें नांव राजपल्ली या शब्दाचा अपभ्रंश आहे असें स्पष्ट दिसतें. राजीवली, बामणोली आणि मांगवली हे तीन गांव शेजारी शेजारीं आहेत. पूर्वी तेथें डोंगरकोळी लोकांचें राज्य होतें असें दंतकथेवरून समजतें. तेव्हां राजे आणि त्यांचे भाऊबंद रहात असत ती राजीवली. राजांचे आश्रित, पुरोहित ब्राह्मण रहात ती बामणोली आणि मांगलोकांची आळी ती मांगवली अशीं हीं गांवांची नांवें पडलीं असें या आख्यायिकेवरून दिसतें. पण हे राजे आपल्या कहाण्यांतील आटपाट नगराच्या राजासारखेच असावेत. त्यांच्या बायका गुरें चारीत, गोठ्यांत रहात, घरचीं कामें स्वतः करीत वगैरे जें चित्र आपल्या डोळ्यांसमोर उभें राहतें तसेंच राजीवलीच्या राजांबद्दलहि वाटतें. कारण तेथें राजनिवासनिदर्शक अशी कोठलीहि भव्य वास्तू वा वास्तूचे अवशेषहि पाहावयास मिळत नाहींत. मात्र बामणोलीच्या डोंगरांत एकदोन गुहा कोरलेल्या आहेत.








## माणगांव तालुक्यांतील गांवांचीं नांवें

एका गांवाचें नांव मुद्रे असें आहे. येथें कोणत्या राजानें आपली मुद्रा कोणत्या महत्त्वाच्या कागदावर कधीं उठविली होती कोणजाणें ? अथवा कोणा इसमाला येथील भूमींत केव्हां सुवर्णाच्या वा रुप्याच्या मुद्रांचा निधि सांपडला होता कीं काय हेंहि आपणाला माहिती नाहीं. पण या गांवाच्या हद्दींत एक अशोकाचा शिलालेख होता असें म्हणतात पण १९४६।४७ सालीं झालेल्या हिंदुमुसलमानांच्या दंग्यांत तो छिन्नविच्छिन्न होऊन गेला. पण ज्याअर्थीं तेथें असा शिलालेख होता त्या अर्थीं या गांवाशी राजमुद्रेचा संबंध आहे हें खास.

कविलवहाळ खुर्द आणि कविलवहाळ बुद्रुक या नांवाचीं दोन गांवें आहेत. या नांवांतील अंत्यपद वहाळ हें तें गांव ओढ्याकाठीं वसलें असल्याचें कथन करीत आहे. पण लोकव्यवहारांत हीं गांवें कैलवाड या नांवानें संबोधिलीं जातात. यामुळें वहाळचा अपभ्रंश वाड आहे याबद्दल शंका निर्माण होते. आणि पूर्वपद जें कविल अथवा कैल त्याचा तरी अर्थ काय ? हा कविल अथवा कैल हा शब्द कौल म्हणजे अभय या शब्दावरून निर्माण झाला असावा असें वाटतें. कारण या गांवीं आदिलशाहीपासून पाठारेप्रभु ज्ञातीचें सरदेशमुखाचें घराणें मोठ्या चौसोपी वाड्यांत इतमामानें नांदत होतें. आजूबाजूच्या अधिकारक्षेत्रांतील गांवाच्या जमीनींचे कौलनामे ते देत असतील आणि असे कौल मिळण्याची वाडी ती कैलवाड या नांवानें संबोधिली जाऊं लागली असेल. किंवा कोळवहाळ या नांवानें तो गांव ओळखला जात असल्याचीहि शक्यता आहे. कारण कुंभे घाटांतून बंदरपट्टीकडे येणारा रस्ता याच गांवावरून येतो. अशा नाक्याच्या ठिकाणीं एखादें कोळीराज्य असणेंहि संभवनीय आहे.

वाशी हवेली आणि वाशी महागांव या नांवाचीं दोन गांवें या तालुक्यांत आहेत. यांतील हवेली आणि महागांव हीं भागाचा निर्देश करणारी पदें सोडून दिलीं तर वाशी हा एकच शब्द शिल्लक राहतो. भटकें शिकारी जीवन सोडून देऊन कृषि संस्कृति स्वीकारून माणूस एके ठिकाणीं वास्तव्य करून राहूं लागला याची स्मृति या नांवांनीं चिरंजीव केली आहे. कारण त्यामुळेंच दुसरें कोणतेंहि पद मागें न लागतां निवास ( वास ) दर्शक वाशी या नांवानें या वस्तींना लोक ओळखूं लागले असावेत.

नगरोळी हें गांवाचें नांव नगर आणि ओळी या दोन ग्रामत्वदर्शक पदांच्या सयोगानें तयार झालेलें आहे त्याचा वेगळा असा अर्थ नाहीं असें वाटतें.

रोवळे हें गांवाचें नांव रोवळी ही सर्वपरिचित अशी तांदुळाचा वैरा धुण्याची वस्तु असते तिच्यावरून पडलें असण्याचा जेवढा संभव आहे तेवढाच संभव रोही या नांवाचा हरिणाच्या जातीचा प्राणी ज्याला या भागांत रुई असें म्हणतात त्याच्या नांवापुढें ळे हें ग्रामत्त्वदर्शक पद लागून तयार झालें असण्याचा संभव आहे. रुई हें या भागांत वैपुल्यानें सांपडणारें वन्य जनावर आहे. भात भिजत घालून तें उपसून त्याला मोड आले म्हणजे मग तें पेरण्याची पद्धत आहे. त्याला रोह करणें असें म्हणतात. असें भात पेरण्याची पद्धति ज्या गांवीं होती त्या गांवाला रोहपळी असें नांव पडून त्याचें रूप रोवळे असें झालें असण्याचाहि संभव आहे.

फलाणी हें गांवाचें नांव फारशी भाषेंतील फलान् अगर अरबी भाषेंतील फुलान् या शब्दावरून झालेला आहे. एखाद्या वस्तूचें नांव न घेतां मोघम उल्लेख करावयाचा तर मराठी भाषेंतहि फलाणा असा शब्द वापरतात. तेथील वस्तीचें नांव स्मरल्यामुळें कोणीतरी " त्या फलाणी वस्तीवर जाऊन ये " असें केव्हांतरी म्हटलें असेल आणि तोच शब्द त्या वस्तीचें नांव म्हणून रूढ झाला असावा असा माझा समज आहे. जर्व्हिस याच्या हिस्टरी आफ दी कोंकणमध्यें या गांवाचा उल्लेख फुलानी असाच केला आहे.

वांजळोशी हें गांवाचें नांव पहा. वांजळ या शब्दाला ओशी हें ग्रामत्वबोधक पद लागून हें नांव तयार झालें आहे. वांजळ या शब्दाचा अर्थ वंध्या—वांझ स्त्री असा आहे. केव्हांतरी या गांवांत बऱ्याच बायकांना मुलें झालीं नसतील तेव्हां आजूबाजूच्या लोकांनीं व्यंगार्थानें वांजळोशी म्हणण्यास सुरुवात केली असावी आणि काळांतरानें तेंच नांव रूढ झालें असेल.

उतेखोल हें गांवाचें नांव कानडी भाषेंतील आहे. उत्तू म्हणजे नांगरणें आणि कोळ्ळ म्हणजे दोन टेकड्यांमधील दरी यावरून झालें आहे असें दिसतें.

या तालुक्यांत चाच आणि चोखली या नांवांचीं दोन गांवें आहेत. त्याचा अर्थ अनुक्रमें चांचे लोकांचें निवासस्थान आणि चोरांचें गांव असा आहे. आजच्या

सभ्यतेला हे धंदे गर्ह्य वाटतात पण मानव समाजाच्या इतिहासांत एक काळ असा होता कीं चांचेगिरी आणि चोरी हे धंदे विशेषसे निंद्य वाटत नव्हते. याच वर्गांतून राजसंस्था उदय पावली आहे आणि विकसित झाली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. पण चांचेगिरी समुद्रावर चालावयाची आणि चाच हा गांव तर समुद्रापासून बराच दूर अंतरावर आहे अशी शंका स्वाभाविक उत्पन्न होते. पण चांच्याचा धंदा पावसांत समुद्र खवळल्यावर बंद होत असे व त्यांना पावसाळाभर कोठें तरी कालक्रमणा आणि कुटुंबसहवास करण्यासाठीं आणि केलेली कमाई सुरक्षित ठेवण्यासाठीं चांगल्या दुर्गम जागेची जरूर वाटत असे. त्या दृष्टीनें त्यांनीं या स्थानाची निवड केलेली असावी. तसेंच घाटावरून बंदराकडे येणाऱ्या व्यापारी तांड्यांवर हल्ला करून त्यांचें सर्वस्व हरण करण्याचा चोरीचा धंदाहि येथें उजळमाथ्यानें चालत असणें अशक्य नाहीं हें या संदर्भानें लक्षांत घ्यावयास पाहिजे.

जावठे आणि जावली हीं दोन गांवांचीं नांवें जा या शब्दाला ठे आणि वळी हीं ग्रामत्व दर्शक पदें लागून झालेलीं आहेत. यांतील जा चा अर्थ काय असावा हें मात्र ध्यानांत येत नाहीं. कदाचित् जाई या फुलवेलीवरून अथवा जया नांवाच्या देवीवरूनहि हें नांव पडलें असण्याचा संभव आहे. पण तसें निश्चित विधान करितां येत नाहीं. चंद्रराव मोरे याच्या राजधानीचें गांव जावली हें निरर्थक असेल असें वाटत नाहीं.

एका गांवाचें नांव आहे जोर ! आणि खरोखर तें गांव एवढ्या उंच डोंगरमाथ्यावर वसलें आहे आणि तेथें जावयाचा रस्ता एवढा उभा आणि त्रासदायक आहे कीं अंगांत चांगला जोर असल्यावाचून तेथें जाण्याचें नांवच काढावयास नको. आणि यामुळेंच त्या गांवाचें नांव जोर ठेवलें कीं काय अशी शंका येते. पण दुसरा असा एक तर्क सुचतो कीं जेथें हा गांव वसला आहे तेथून रायगड हा राजधानीचा किल्ला अगदीं नजीक आहे आणि मध्यंतरी डोंगर वगैरे कांहीं अडचणहि नाहीं. तेव्हां प्रसंगीं रायगडावरील सैन्याला जोर म्हणून येथील लोकांचा उपयोग होत असावा किंवा येथेंहि कांहीं सैनिक ठेवून त्यांचा उपयोग रायगडाच्या संरक्षणाला जोर यावा म्हणून केला जात असण्याचा संभव आहे. आणि रायगडाला जोर देणारें गांव जोर या नांवानें संबोधलें जाऊं लागलें असेल. किंवा असाहि तर्क करावासा वाटतो कीं रायगड किल्ला बांधण्यापूर्वीं त्याचा नैसर्गिक दुर्गमतेचा फायदा घेऊन पूर्वींचे स्थानिक राजे त्याचा राजधानीसारखा उपयोग करीत असावे. आणि या राजधानीला जोड म्हणून जोर या दुर्गमस्थानाचा उपयोग करण्यांत येत असावा आणि त्यामुळेंच त्या गांवाचें नांव जोड असेंच पडलें असेल. आणि येथील स्थानिक लोक ड चा उच्चार र असा करतात त्याप्रमाणेंच जोडचें रूप जोर असें झालें असण्याचाहि संभव आहे.

याप्रमाणें माणगांव तालुक्यांतील सर्व गांवांच्या नांवाचा यथामति आणि यथाशक्ति विचार केला. शक्य तेवढ्या पूर्वग्रहरहित मनानें चिंतन करून जें सुचलें आणि त्यांतील जें रुचलें तें मांडलें आहे. हें सर्व विवेचन अखेरचा शब्द नव्हे. यांत थोरांच्या विचारानें फेरफार होऊं शकेल. असा फेरफार करण्यांत मला आनंदच होईल. कारण त्यामुळें अधिक निर्दोषत्व या विवेचनाला येईल.

---











अनुक्रमणिका








श्री. म. ह. दाते

# नासदीय सूक्त : ३ :

**ऋचा ३ :**

'ऐशी अगम्य ईश्वरी लीला ।
ब्रह्मानंदीं गम्य तुक्याला ॥'

तिसरी ऋचा–

'तम आसीत्तमसा गूढमग्रेऽ प्रकेतं
सलिलऽसर्वं मा इदम् ।
तुच्छेनाभ्वपिहितं यदासीत्
तपसस्तन्महिनाऽजायतैकम् ॥'

**लो. टिळक :–** अंधकार होता. आरंभीं हें सर्व अंधकारानें व्याप्त ( आणि ) भेदाभेदविरहित पाणी होतें, किंवा आभु म्हणजे सर्वव्यापी ब्रह्म ( आरंभीच ) तुच्छानें म्हणजे फोल मायेनें आच्छादिलेलें होतें. असें ( यत् ) जें ( म्हणतात ) तें ( तत् ) मूळ एक ( ब्रह्मच ) तपाच्या महिम्यानें ( रूपांतरानें पुढें ) प्रगट झालेलें होतें.

**श्रीशंकराचार्य :–** "तम म्हणजे जगद्विकाराचें उपादान कारण; मूळ अज्ञान; ह्यालाच माया, अविद्या, शक्ति इत्यादि संज्ञा आहेत. ज्याप्रमाणें तम पदार्थांना आच्छादित करतें, त्याप्रमाणें तम पदार्थांना आच्छादित करतें, त्याप्रमाणें हें मूळ अज्ञानहि ब्रह्मतत्त्व आच्छादित करीत असल्यामुळें ह्यालाहि तम असें म्हणतात. तशाप्रकारचें जगत् विकार उत्पन्न करण्यास योग्य व ब्रह्माचें ठिकाणीं असलेलें कांहीं तम त्यावेळीं होतें. त्या तमाच्या योगानें सर्व जगत् गूढ होतें. सारांश मृत्तिकेच्या पिंडामध्यें ज्याप्रमाणें घट गुप्त असतो. अथवा बीजाचें ठिकाणीं ज्याप्रमाणें वृक्ष गुप्त असतो त्याप्रमाणें तमाचे ठिकाणीं सर्व जगत् त्यावेळीं गुप्त होतें; आणि म्हणूनच त्याचें ज्ञान होणें फारच अशक्य होतें.

'आसीदिदं तमोभूतं अप्रज्ञातं अलक्षणम् ।
अप्रतर्क्यं अविज्ञेयं प्रसुप्तमिव सर्वतः ॥

ह्या मनुस्मृतींतील वचनामध्येंहि असेंच सांगितलें आहे. 'सलिलऽसर्वमाइदं ' हा दृष्टांत आहे. ज्याप्रमाणें पर्जन्यामध्यें पडलेल्या गारा वितळल्या असतां उदकरूपानेंच अवशिष्ट रहात असतात, त्याचप्रमाणें हें सर्व जगत् तम होतें; म्हणजे केवळ तमोरूपानें तें अवशिष्ट होतें. असत्कार्यवादी–काणादप्रभृति–कारणाचे ठिकाणीं पूर्वी विद्यमान नसलेलेंच कार्य उत्पन्न होत असतें, असें म्हणतात; परंतु सत्कार्यवादी-सांख्यप्रभृति-कारणामध्यें पूर्वी अव्यक्त रूपानें विद्यमान असलेलेंच कार्य सत्कारणाच्या व्यापारानें अभिव्यक्त होतें– असें म्हणत असतात. ह्या दोन मतांपैकीं सत्कार्यवादी सांख्यादिकांचेंच मत श्रुतीनें स्वीकारलें आहे. आसमंतात जें उत्पन्न होतें, तें आभु म्हणजे जगत् होय. तें जगत् तुच्छानें आच्छादित होतें. केवल तत्त्वज्ञानानेंच निवृत्त होत असल्यामुळें जगताचें कारण जें मूळ अज्ञान तें तुच्छ होय. ह्या तुच्छानें प्रलयकालीं जगत् आच्छादित झालेलें होतें. अशा प्रकारचें जें जगत् होतें, तें जगत् अव्यक्त होतें आणि पूर्वी सांगितलेल्या अज्ञानरूप तमापासून तें महत्त्वानें, म्हणजे अभिव्यक्त झालेलें जें जगत्-स्वरूप त्या स्वरूपानें उत्पन्न झालें. तस्मात् अज्ञानदृष्ट्या जगत्रूपानें भासमान असणारें हें ब्रह्म वस्तुतः एकच आहे."

–ह्या ऋचेचा अर्थ अनुभवी व ज्ञानी संताच्या दृष्टीनें काय होतो तो आपण पाहूं:—

प्रकेतं म्हणजे 'प्रकर्षेण ज्ञातुमशक्यम्', तें समजणें अत्यंत कठीण. त्या स्थितीचें ज्ञान, त्या स्थितीचा अनुभव असल्याशिवाय होणें शक्य नाहीं.

"कहत कठिण, समुजत कठिण, साधत कठिण विवेका।
होइ घुनाच्छरन्यायजौ पुनिप्रत्यूह अनेक ॥"

–श्री तुलसी

ज्ञान समजावून सांगणें कठीण, जरी चांगल्या तऱ्हेनें समजावून सांगता आलें, तरी तें समजणें कठीण आहे. समजा तें जरी समजलें, तरी त्याची साधना फार कठीण आहे. घुणाक्षरन्यायानें एकाद्याला साधन करणें








साधलें तरी तें टिकविण्यांत महान् विघ्नें असतात. म्हणून श्रुति माउली म्हणते :-

' नान्तः प्रज्ञं न बहिष्प्रज्ञं नोभयतः प्रज्ञं न प्रज्ञानघनं न प्रज्ञं ना प्रज्ञम् । अदृष्टं अव्यवहार्यं अग्राह्यं अलक्षणं अचिंत्य अव्यपदेश्यं एकात्मप्रत्ययसारं प्रपंच्चोपशमं शांतं शिवं अद्वैतं चतुर्थं मन्यन्ते स आत्मा स विज्ञेयः ॥'

अव्यपदेश्यम् म्हणजे जो दाखवितां येत नाहीं व एकात्मप्रत्ययसारम् म्हणजे एक मात्र आत्मसत्तेची प्रतीति हेंच ज्याचें सार आहे, अशा त्या तूष्णी, शांत, शिव अवस्थेचें वर्णन 'तम' या शब्दानेंच करावयास पाहिजे. ज्या अवस्थेचें आकलन होणें अशक्य त्यामुळें त्या स्थितीला 'तम' किंवा अज्ञात अवस्था म्हणणें प्राप्त आहे. जें शब्दांनीं सांगतां येत नाहीं, व अनुभवा-शिवाय कळणें शक्य नाहीं त्या अवस्थेला अज्ञान किंवा तम म्हणणें योग्य नाहीं. आपल्याला जर समजत नसेल तर तसें स्पष्ट शब्दांत कबुली देण्यास एवढे आढेवेढे कां ? जी स्थिति समजत नाहीं त्या स्थितीला वाटेल तें नांव देणें बरोबर नाहीं. अनुभवी संत त्या अवस्थेचें अगदीं हुबेहुब वर्णन करूं शकतात.

**श्रीज्ञानराजमाउली —**

१. ' तृप्ति भुकेलि काय करूं माये ।
जीवनीं जीवन कैसे तान्हेजत आहे ॥ १ ॥
मन धालें परि न धाये ।
पुढत पुढति राजा विठ्ठलु पाहे ॥ ध्रु० ॥
निरंजनीं अंजन लेइजत आहे ।
आपुलें निधान कैसें आपणचि पाहे ॥ २ ॥
निवृत्ति गार्हस्थ्य मांडलें आहे ।
निःकाम आपत्य प्रसवत जाये ॥ ३ ॥
त्रिभुवनी आनंदु न माये गे माये ।
आपे आपु परमानंदु वोसंडतु आहे ॥ ४ ॥

२. ब्रह्मी ब्रह्म होणें हें तों कठीण सांगता ।
आब्रह्मीता जयाचिया सत्ता विस्तारले ॥ १ ॥
सांगता नये सांगावें तें काय ।
तेथील हे सोय गुरूखुणा ॥ ध्रु० ॥
मन हें अमोलिक जरि गुंफे अमुपा ।
तरि हा सोपा मार्ग रया ॥ २ ॥
बापरखुमादेवीवरू ब्रह्मविद्येचा पुतळा ।
तेथील हे कळा निवृत्तिप्रसादे ॥ ३ ॥

" तम आसीत्तमसागूढमग्रे प्रकेतम् "

येथें 'तम' याचा अर्थ तूष्णी अवस्था, आत्यंतिक शांत अवस्था. 'तूष्णीमवस्थापरमोपशान्ति'

**श्रीतुकारामः** – "पिकलें स्वरूप आलिया घुमरी ।
रासी ते अंबरीं न समाये ॥ "

**अवधूत गीतेंत या स्थितीचें वर्णन –**

१ ' अबोधबोधो ममनैव जातो
बोधस्वरूपं ममनैव जातम् ।
निर्बोधबोधं च कथं वदामि
स्वरूपनिर्वाणमनामयोऽहम् ॥

२ अस्तं गतो नैव सदोदितोऽहम्
तेजोवितेजो नच मे कदाचित् ।
संध्यादिकं कर्म कथं वदामि
स्वरूपनिर्वाणमनामयोऽहम् ॥

**तैत्तिरीयोपनिषद् –**

' असद्वा इदमग्र आसीत् । ततो वै सदजायत ।'
जसा तम शब्द आहे तसाच येथें 'असत्' शब्द आहे.

' यतो वाचो निवर्तन्ते । अप्राप्य मनसासह ।
आनंद ब्रह्मणो विद्वान । न बिभेति कदाचनेति ।
तस्यैष एव शारीर आत्मा यःपूर्वस्य ॥ '

हें अबोलण्यांतलें बोलणें आहे. येथें 'असत्' या शब्दाचा अर्थ – ' एको देवः सर्वभूतेषु गूढः । सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा ॥ असत् म्हणजे गूढ व सर्वव्यापी केवल तत्त्व. 'अ' म्हणजे सर्वव्यापी, पूर्ण, विश्वव्यापी (विष्णु) त्याचप्रमाणें 'तम' या शब्दाचा अर्थ गूढ, सर्वव्यापी, आनंदमय, केवल तत्त्व. शांत व गूढ भाव नेहमीं परमानंद स्थितींतच असतो.

" तिहीं देवासि आकारु जेथूनि विस्तारू ।
तो ध्वनि ओंकारू त्या अरुता ।
तेथें नाद बिंदु कळा ना छंदु ।
अक्षई परमानंदु सदोदितु ॥ " –श्री ज्ञानेश्वर०

**तैत्तिरीय उपनिषदाच्या सहाव्या अनुवाकांत :–**

' असन्नेव स भवति । असत् ब्रह्मेति वेद चेत् ।
जर कोणी ब्रह्म नाहीं (असत्) असें म्हणेल, अगर समजेल, तर तो 'असत्' होतो, म्हणजे मूर्ख आहे असें समजावें. नाहीं पासून आहे ची उत्पत्ति कशी होईल ? म्हणून ह्या ठिकाणीं 'असत्' या शब्दाचा अर्थ शांत, सर्वव्यापी, विभु, आनंदमय असा आहे. त्याचप्रमाणें 'तम' या शब्दाचा अर्थ येथें



अनुक्रमणिका






शांत, सर्वव्यापी, विभु व आनंदमय आहे. कारण ब्रह्म हें प्रत्यक्ष ज्ञान आहे. ज्ञान प्रकाशमय व आनंदमय असतें. ब्रह्म जर ज्ञान आहे, तर त्यांत अज्ञान, अंधकार आला कोठून ? अखिल ब्रह्मांडाची उत्पत्ति, स्थिति व लय जर आनंदापासून आहे, तर ह्या ठिकाणीं 'तम' या शब्दाचा अर्थ अंधकार, अज्ञान घेतांयेणें शक्य नाहीं. येथें 'तम' या शब्दाचा अर्थ घनानंदस्थिति असा आहे. 'आनन्दो ब्रम्हेति व्यजानात् । आनंदात् एव खलु इमानि भूतानि जायन्ते । आनंदेन जातानि जीवन्ति । आनंदं प्रयन्ति अभिसंविशन्ति ॥

**मुण्डकोपनिषद्:–**

'यः सर्वज्ञः सर्वं विद्यस्य ज्ञानमयं तपः ।
तस्मादेतद्‌ब्रम्ह नामरूपमन्नं च जायते ॥'

जो सर्वज्ञ, सर्वांना जाणणारा, त्याचें ज्ञानमय तप आहे. व ह्या ज्ञानमय तपापासून त्या परमेश्वरानें विराट् स्वरूप जगत् नाम व अन्न उत्पन्न केलें.

नासदीयसूक्तांतील ऋचा सृष्टि उत्पत्तिविषयीं आहेत. तेथें 'तम' या शब्दाचा अर्थ अज्ञान, अंधकार कसा घेऊन चालेल. अज्ञानांतून जगताची उत्पत्ति कशी होऊं शकेल ? अज्ञानांतून जगाची उत्पत्ति झाली, हें म्हणणें वेडगळ साधकाला समजावून देण्यासाठीं आहे.

**तिसऱ्या ऋचेचा दुसरा पाद–**

'सलिलं सर्वं मा इदम्'

**मनुस्मृतिः–**

'तस्माल्लीला रसमयी रसो लीलामयः स्मृतः ॥

स्मृतिसुद्धां ब्रम्हाचें लीलामय रस व रसमयी लीलेचें अभेद वर्णन करिते. 'परास्य शक्तिर्विविधैवश्रूयते' इत्यादि, अनंत शक्तिसंपन्न ब्रम्ह आपल्या शक्तिद्वारा अनंत लीला करीत असतें. अनंत ब्रम्हांडांची उलथापालथ ही ब्रम्हाची लीला आहे. ब्रम्ह हें 'नित्यानंद विग्रह' आहे. जगत् हें ब्रम्हाचा विलास आहे.

**श्रीतुलसीदासः–**

केशव ! कहि न जाइ, का कहिए ।
देखत तव रचना विचित्र हरी ।
समुझि मनहिं मन रहिए ॥ १ ॥
सून्य भीतिपर चित्र, रंग नहि,
तनु बिनु लिखा चितेरे ।
धोएँ मिटइ न मरइ भीति
दुःखु पाइअ पहि तनु हेरे ॥ २ ॥
रविकर नीर बसै अति दारुन
मकररूप तेहि माही ।
बदनहीन सो ग्रसै चराचर
पान करन जे जाही ॥ ३ ॥
कोउ कह सत्य झूट कह कोऊ
जुगल प्रबल कोउ मानै ।
तुलसिदास परिहरै तीनि भ्रम
सो आपुनु पहिचानै ॥ ४ ॥

त्या ब्रह्मानंदाचा खेळ कसा आहे पहाः –

**कबीरः–**

हम वासी उस देशके, जहाँ बारहमास विलास ।
प्रेम झरे विकसै कँवल, तेजपुंज परकास ॥
हम वासी वा देशके, जहाँ पारब्रह्मका खेल ।
दीपक जरै अगम्यका, बिनवाती बिन तेल ॥

**श्रीज्ञानेश्वरमाउली:–**

१. 'अलाडु आडु पलाडु आडु मध्यें वाहे पाणी ।
तिही संधी खेळु मांडिला सितादेवि राणी ॥ १ ॥
सुखाति चांदिणें राती ।
बहुतें खेळती येकु देखे ॥ ध्रु० ॥
खेळतां खेळतां नवल पाहे देखणा खीर खाये ।
सांपडे ते कोणा न संगे भोग्या शिवोन राहे ॥ २ ॥
भोगिया सिवोन उतरला डायीं ।
ज्ञानदेव सांगे निवृत्तीच्या पायीं ॥ ३ ॥

२. पुरुषेविण नारी संचरली शरीरी ।
आपण्यावरी आळु आला ॥ १ ॥

३. काय कोण्यासंगे सिणलिये अनुरागे ।
पडलिये पतिसंगे अवस्थाभूत ॥ ध्रु० ॥
बापरखुमादेविवरू विठ्ठलु जैसा तैसा ।
व्यापूनि आकाश उरला असे ॥ १ ॥

४. निरंजनवना गेलिये साजणी ।
तेथें निर्गुणें माझा मनीं वेधियेले ॥ १ ॥
सुखाची अति प्रीति जाहली गे ब्रह्मी ।
श्रीगुरू निवृत्तिमुनी मी जाहलें गे माये ॥ ध्रु० ॥
बापरखुमादेविवरू विठ्ठलु सहजावला ।
निर्गुण दाविला विसुरागे माये ॥ २ ॥

५. पातेजोनि खेवासि आणिले ।
येणें आपणिया समान मज केलें गे माये ॥१॥
पाहे पां नवल कै सेवितलें ।
मन उन्मनी उन्मन ग्रासले ॥ ध्रु० ॥
पाहे पां येणें रखुमादेविवरु विठ्ठले ।
पाहे पां राहणें पंढरपुरी केले ॥ २ ॥

६. माझें स्वरूप म्याचि शृंगारिलें ।
निर्वाणी केले म्या ळ्याकार ॥ १ ॥
आपुली सोये वाढवावया गेले ।
तव आपणचि जाले आपण्या ठायीं ॥ ध्रु० ॥
सहज गुणाचेनि निर्गुण वो केले ।
माझे म्या पाहिलें मन मावळूनि गे माये ॥ २ ॥
तीन चारी मिळोनि एके ठायीं घातले ।
बाप रखुमादेविवरा विठ्ठली फावले ॥ ३ ॥

७. जाणो गेल्ये तव जाणणें राहिले ।
पाहो गेलिये तव तेचि झाले गे माये ॥
इंद्रियासहित चित्त ठकलेचि ठेलें ।
मी माझें विसरलें स्वयें भाव ॥ १ ॥
ऐकोनि देखोनि मन होये आंधळे ।
परतोनि मावळे नाहीं तेथें ॥ ध्रु० ॥
अविद्या निरसली माया तुटली ।
त्रिगुण साऊली तेथें रूप कैचें ॥
चांग विचारिले विवेके उगवलें ।
ज्ञान हारपलें तयामाजी ॥ २ ॥
मुकियाचे परी आनंदुभीतरी ।
अमृत जिन्हारी गोड लागे ॥
बाप रखुमादेविवरू विठ्ठलु जागे ।
संत ये खुणें संतोषले ॥ ३ ॥

संतांना हा भगवंताचा खेळ फार आवडतो व भगवंतानीं लपंडाव कां केला, म्हणजे मग मात्र त्यांना भगवंताच्या विरहाचें भयंकर दुःख होतें. येथें संत हा शब्द स्त्रीपुरुष असा भेदाभेद न करतां दोन्ही भाव भगवंताचेच असल्यामुळें दोन्ही अर्थी एकच वापरला आहे.

विरहदुःखाचा मासला पहा :—

१. सुखादि सुख तें झाले अनमीष ।
पाहणें तें एक पारुषले ॥ १ ॥
काय सांगू मातु वेगळींच धातु ।
जिव हा जिवांतू व्यापुनि ठेला ॥ ध्रु० ॥
न चले न चले कांहीं कौरालका मान
देहींच विंदान रचलें गे माय ॥ २ ॥
बापरखुमादेविवरु विठ्ठले निटे ।
वायाविण विटे मिस केले ॥ ३ ॥

२. पडलें दूर देशीं मज आठवे मानसीं ।
नको नको हा वियोग कष्ट होताति जिवासी ॥१॥
दिनु तैसी रजनी जाली गे माये ।
अवस्था लावूनि गेला अजुनि कां नये ॥ध्रु०॥
गरूड वाहना गंभीरा येईं गा दातारा ।
बापरखुमादेविवरा श्रीविठ्ठला ॥ २ ॥

३. जीवाचियाजीवा प्रेमभावाचिया भावा ।
तुजवाचूनि केशवा अनु नावडे ॥ १ ॥
जीवें अनुसरलिये अजुन कां नये ।
वेगीं आणा तो सये प्राण माझा ॥ ध्रु० ॥
सौभाग्य सुंदर लावण्य सागरू ।
बापरखुमादेविवरु श्री विठ्ठलु ॥ २ ॥

४. अवचिता परिमळु झुळुकला अळुमाळु ।
मी म्हणे गोपाळु आला गे माय ॥ १ ॥
चांचरती चांचरती बाहेरी निघाले ।
ठकचि मो ठेलें काय करूं ॥ २ ॥
मज करा कां उपचारु अधिक तापभारू ।
सखिये सारंगधरू भेटवा कां ॥ ध्रु० ॥
तो सांवळां सुंदरू कासे पितांबरू ।
लावण्य मनोहरू देखियेला ॥
भरलिया दृष्टीं जव डोळा न्याहाळीं ।
तव कोठें वनमाळी गेला गे माय ॥ २ ॥
बांधोनि ठेलें मन, तव झाले आने आन ।
सोकोनि घेतलें प्राण माझे गे माय ॥
बाप रखुमादेवीवरू विठ्ठल सुखाचा ।
तेणें काया मनें वाचा वेधियेलें ॥ ३ ॥

कबीर —

है कोइ ऐसा पर-उपगारी,
हरिसूँ कहै सुनाइ रे ।
ऐसे हाल कबीर भये हैं
बिनु देखे जिय जाइ रे ॥

स्वरूपानंदांत मग्न होऊन मस्त झालेले संत कसे स्वैर बोलतात पहा :-



अनुक्रमणिका






**श्री एकनाथ–**

१. सौरी झालें बाई आतां करू गत काई।
बसवी झाले बाई आता भिन्नभेद नाही ॥ १ ॥
कासरा लावून सासरा मारला दादला टाकून आले।
आत्मलिंग पाहुनिया मगनमस्त झालें ॥ २ ॥
बांधुनि बुचडा उघडा माथा विभूतिचा पट्टा।
आला गेला म्हटला नाहीं धरल्या चारी वाटा॥३॥
उभी शिंदळ घाली गोंधळ हाचि लाभ मोठा।
मागें पुढें पाहू नका वेगीं काम लाटा ॥४॥
ल्हान थोर म्हटला नाहीं जाहले मी वेडी।
एका जनार्दनी बसवी झाले परद्वार गोडी ॥५॥

२. जातिभ्रष्ट सारी हिंडे दारोदारी।
सांवले उचकुनी जगासी दावी डौर वाजवी करी ॥१॥
चाल सख्या रामा। सुख होईल आम्हा ॥ ध्रु० ॥
हागरा दादल्या पादरी बायकु जावई देखोनि हांसे।
घरची सून नागवी नाचे पोटी पोर पिसे ॥ २ ॥
शेंबडा व्याही चिपडी विहीण दोघा प्रीत मोठी।
बहीण लाजुनि हळुच पाहे व्याही नाक चाटी ॥३॥
बाईल बाहीरख्याली दादला तिचा भोळा।
परपुरुष पाहूनीया खुणाविती डोळा ॥४॥
ऐसी सौरी गमजा करी डौर छंदे नाचे।
एका जनार्दनीं पायीं नाम अखंड नाचे ॥५॥

३. होउनी स्वैरी लुगडे फेडी भलत्यासवे हांसे।
हांसत हांसत घर घेतलें कोण मज पुसे ॥ १ ॥
लगला मज चाळा कांहो घालता डोळा।
फजितीचा वाटा आला नित्य नवा गोळा ॥ २ ॥
मागें पुढें न पाहे कांहीं म्हणेल कोणी।
एका जनार्दनीं शरण काया वाचा मनीं ॥ ३ ॥

४. हाट करूनी घरासी आणिली
बैसली वसरीच्या काठी रे।
घरची बाईल बाहेर निघाली
वसवसून लागे पाठी रे ॥ १ ॥
शंखीण बाबा डंखीण रे
त्या घरीं शंखीण बाबा डंखीण रे ॥ ध्रु० ॥
चौ शेराचा वरण भात केला
वर भाजीचा गोळा रे।
मोठे मोठे घास घेती
भुरळ फिरवी डोळा रे ॥ २ ॥
आठ भाकरी बारा पोळ्या
धिरडी खादली सोळा रे।
पाणी पिउनी ढेकर दिला
मराठी तिचा मोळा रे ॥ ३ ॥
बारा सोळा लुगडी नेसली
येइना पाठी पोटी रे।
नवखणाची चोळी शिवली
उरास येईना गाठी रे ॥ ४ ॥
एका जनार्दनी म्हणे बाबा
ऐशी बाईल केली रे।
तिच्या भयानें सर्व दैवतें
पळूनिया गेली रे ॥ ५ ॥

**श्रीतुकाराम महाराज–**

१. चाल माझ्या राघो, डोंगरी दिवा लागो ॥ ध्रु० ॥
घर केलें दार केलें घरीं नाहीं वरो।
सेजारणी पापिणीची पांच पोरे मरो ॥ १ ॥
घरीं पांच पोरे ती मजहुनि आहेत थोरे।
पांचाच्या बळें खादली बावन्न केळे ॥ २ ॥
घर केलें दार केलें दुकान केला मोटा।
पाटाची राणी धांगडधिंगा तिचा मोठा ॥३॥
दुकान केला मोटा तर पदरीं रुका खोटा।
हिजडा म्हणसी जोगी तर सोळा सहस्र भोगी।
तुका म्हणे वेगीं तर हरि म्हणा जगीं ॥ ४ ॥

२. साते चला काजळ घाला तेल फणी करा।
माया मोह सांडवलें तीहि लोकीं झाले सरती ॥१॥
चाल विठाबाई अवघी पांज देई।
न धरी गुज कांहीं वाळवंटी सांपडता ॥ २ ॥
हिंडोन चौऱ्यांशीं घरें आले तुझ्या दारा।
एक रुक्यासाठीं आंचवले संसारा ॥ ३ ॥
लाज मेली शंका गेली नाचो महाद्वारीं।
भ्रांति सावले फिटोनि गेले
आतां कैची उरी ॥ ४ ॥
झाले भांडी जगा सांडी नाहीं भीड चाड।
घालीन चरणी मिठी पुरवीन
जीवीचें तें कोड ॥ ५ ॥
तुका म्हणे रुका करी संसार तुटी।
आतां तुम्हां आम्हा कैसी झाली जीवे साठी ॥६॥

३. समसपाट बेसनकाट निःसंग झाले सौरी।
कुडपीयेला देश आतां येऊ नेदी दुसरी ॥१॥

गाऊ रघुरामा हेंचि उरलें आम्हा ।
नाहीं जीवतमा वित्तगोतासहित ॥२॥
ठाव झाला रिता झाकुनि काय आतां ।
कोणासवे लाज कोण दुजें पाहता ॥३॥
सौरी यांचा संग आम्हा दुरावलें जग ।
भिन्न झालें सुखभाव पालटला रंग ॥४॥
लाज भय क्षणी नाहीं तजियेली दोन्ही ।
फिरवला वेष नव्हो कोणाचीच कोणी ॥५॥
तुका म्हणे हा आम्हा वेष दिला जेणें ।
जना प्रचित सर्वे असो एकपणें ॥६॥

४. वाळो जन मज म्हणोत शिंदळी ।
परि हा वनमाळी न विसंबे ॥१॥
सांडूनि लौकिक झालिये उदास ।
नाहीं भय आस जीवित्वाची ॥२॥
नाइके वचन बोलतां या लोकां ।
म्हणे झालों तुका हरिरता ॥३॥

५. आधिल्या भ्रतार काम नव्हे पुरा ।
म्हणोनि व्यभिचारा टेकलिये ॥१॥
रात्रंदिवस मज पाहिजे जवळीं ।
क्षण त्या निराळी न गमे घडी ॥२॥
नामगोष्ट माझी सोय सांडा आतां ।
रातले अनंता तुका म्हणे ॥ ३ ॥

६. हाचि नेम आतां न फिरे माघारी ।
बैसले शेजारी गोविंदाचे ॥ १ ॥
घर रिघी झालें पट्टराणीं बळें ।
वरिलें सांवळें परब्रम्ह ॥ २ ॥
बळियाचा अंग, संग झाला आतां ।
नाहीं भय चिंता तुका म्हणे ॥ ३ ॥

**कबीर :-**

अविनासी की सेजका, कैसा है उनमान ।
कहिबेकी सोभा नही, देखे ही परमान ॥
अविनासीकी सेजपर, केलि करै आनंद ।
कहै कबीर वा सेजपर, विलसत परमानंद ॥

**श्री भागवताचा दशम स्कंद या लीलामय रस व रसमयी लीलेचें वर्णन करतो–**

'येऱ्हवी विषय जिणोनि जन्मले । ते शुकादिक दादुले ।
ते विषयाची वानिता जाहले । भाट ययाचे ॥ '
–श्री ज्ञानेश्वरी अ.११-९-१७३

–हें आपलें आपल्याशींचि असलेलें मधुर प्रेम आहे. हीच मधुविद्या आहे–

ब्रह्म मधु आहे, भगवान मधुर आहेत. सत् चित् त्याचप्रमाणें सत्य शिव आणि अस्ति भाति असे भगवान आमंद, सुंदर व प्रिय आहेत. त्यांची ही नितांत सुंदरता आणि आनंदतेचि मधुरता नेहमी भागवत संताची भावग्राह्य आहे. भक्ताला भगवानाबद्दल हा भाव परम प्रेमरूप अर्थात् भक्ति आहे. या प्रेमास्पद माधुर्यरसाचा आस्वाद वैदिक ऋषींनीं अनुभवानें घेतला आणि माधुर्य प्रकाशक ब्रह्माचा मधुरूपानें निर्देश केला.

पुष्पामध्यें रस सर्वत्र व्याप्त असतो. मधमाशा त्यां पुष्पांतील रस ग्रहण करून त्यास एकत्र करून मधाचा संचय करतात. आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक सृष्टीचा प्रत्येक घटक एक रसपूर्ण पुष्प आहे. त्यामध्यें अखंड एकरसानें भगवान विद्यमान (अस्ति) व अभिव्यक्त (भाति) आहेत. त्या पुष्पांतील रसरूप माधुर्य भगवंताचें प्रियत्वरूप आहे. व्यक्तसृष्टीच्या घटकामध्यें सर्वत्र समदर्शन करून मधुरूप एकच ब्रह्माचें ग्रहण मधमाशांच्या तत्परतेनें करणारे द्रष्टे यांनीं एकरसानें व्याप्त सच्चिदानंद परब्रह्माचा निर्देश 'मध' अशा यथार्थ सुंदर नांवानें केला आहे; असे एका महाभागाचे उद्गार अर्थपूर्ण आहेत.

**श्रीशुक उवाच —**

१. ' परमिममुपदेशमाद्रियध्वं
निगमवनेषु नितान्तखेदखिन्नाः ।
विचिनुत भवनेषु वल्लवीना—
मुपनिषदर्थमुलूखले निबद्धम् ॥

अरे– परब्रह्माचा शोध करणारानो, वेदान्त वनामध्यें तें सांपडत नाहीं म्हणून खिन्न कां होता ? गोपसुंदरीच्या घरी उपनिषदांचा अर्थ उखळाला बांधलेला आहे तो शोधा.

२. निगमतरोः प्रतिशाखं मृगितं मिलितं न तत्परं ब्रह्म ।
मिलितं मिलितमिदानीं गोपवधूटीपटाञ्चले नद्धम् ॥

–ओहो ! किती परिश्रम केले. वेदान्त वृक्षाची प्रत्येक शाखा न् शाखा शोधली परंतु परब्रह्म कांहीं सांपडलें नाहीं, आतां मात्र सांपडलारे सांपडला. गोपसुंदरीचा ओचा धरून (पदराला किंवा ओच्याला लागटलेला) तो पहा उभा आहे.

३. कं प्रति कथयितुमीशे संप्रति को वा प्रतीतिमायातु ।
गोपतितनयाकुञ्जे गोपवधूटी विटं ब्रह्म ॥

–कुणाला सांगू ? व सांगितलें तर कोण माझें खरें मानणार ? पण खरोखर वस्तुस्थिति अशी आहे कीं एका कुंजामध्यें गोपसुंदरीच्या विशुद्ध प्रेमामुळें–प्रेमामृतपानामुळें रसलंपट होऊन ब्रह्मक्रीडा करीत आहे.

४. श्रुतिमपरे स्मृतिमपरे भारतमपरे भजंतु भवभीताः ।
अहमिह नंदवंदे सस्यालिंदे परंब्रह्म ॥

–संसाराच्या भयानें श्रुति-स्मृति-महाभारताचीं पारायणें करणारे खुशाल करोत. मी मात्र नंदाच्या बाहेरच्या चबुतऱ्यावर उभा असलेल्या परंब्रह्म स्वरूप श्रीकृष्णालाच वंदन करणार.

५. श्रुणु सखि, कौतुकमेकं नंदनिकेतांगने मया दृष्टम् ।
गोधूलिधूसरिताङ्गो नृत्यति वेदान्तसिद्धान्तः ॥

–अग सखे ऐक ऐक ! मी नंदाच्या अंगणांत प्रत्यक्ष वेदान्तसिद्धान्त गोपालकृष्ण धुळीनें भरलेल्या अंगानी नाचत असलेला पाहिला. अशी एक सखी दुसऱ्या एका सखीला पाहिलेलें कौतुक सांगत आहे.

६. अद्वैत वीथीपथिकैरुपास्या
स्वाराज्यसिंहासन लब्धदीक्षाः ।
शठेन केनापि वयं हटेन
दासीकृता गोपवधूविटेन ॥

आत्मराज्याच्या सिंहासनावर ज्यांना अभिषेक झाला आहे असें आत्मनिष्ठ आत्म्यामध्ये खुशाल रममाण होवोत. गोपांगनावर प्रेम करणाऱ्या एका लुच्च्यानें आम्हाला मात्र बळजबरीनें आपला सेवक बनविलें आहे.

७. ध्यानाभ्यासवशीकृतेन मनसः तन्निर्गुणं निष्क्रियम् ।
ज्योतिः किंचन योगिनो यदिपरं पश्यंति पश्यंतु ते ।
अस्माकं तु तदेव लोचनचमत्काराय भूयाच्चिरम् ।
कालिंदीपुलिनोदरे किमपियन्नीलं अहो धावति ॥

## सलिलं हें काय ?

'सलिलं सर्व मा इदम्' या चरणाचें मर्म बरोबर ओळखणारे संतांचे आधार कितीतरी देतां येतील पण विस्तार फार होतो म्हणून आवरतें घेणें भाग आहे. येथें 'सलिलं'चा अर्थ पाणी असा नसून 'लीलामय रस व रसमयी लीला असा आहे. "जै कृष्णचि होइजे आपण । तैं कृष्ण होय आपुलें अंतःकरण ॥" अशी स्थिति झाल्याशिवाय ह्यांतील मर्म कळणार नाहीं. कारण 'परि ऐसें जें प्रेम । तें संतींच आथी निःसीम । म्हणून संतांचे अनुभव लक्षांत घ्यावयास पाहिजेत; त्या शिवाय ह्या आत्मक्रीडेचा उलगडा होणें दुरापास्त आहे.

## तिसरा पाद –

आतां तिसऱ्या पादाचा अर्थ करूं :–

'तुच्छेन आभु अपिहितं यदासीत्'

पहिल्या सूक्ताच्या तिसऱ्या चरणांत 'किमावरीवः व कुह' असे दोन प्रश्न केले आहेत. त्यांचें उत्तर ह्या ऋचेच्या तिसऱ्या पादांत दिलें आहे. येथें 'तुच्छेन' असा शब्द आहे; त्याचा अर्थ फोल, मायेनें, अज्ञानानें, अंधकारानें झांकलेलें असा नसून 'तुष्' म्हणजे आनंद, स्वतःचें स्वतःचे ठिकाणीं असलेलें प्रेम असा आहे. सूर्याला त्याच्या प्रभेचें आवरण आहे असें म्हणण्यापैकीं हें आहे. सूर्य आणि प्रभा हीं जशीं वेगळीं नाहींत, तसें ब्रह्म आणि आनंद वेगळा नाही. आनंद ही ब्रह्माची घोंगडी (आवरण) आहे. श्रीमाउली व इतर संतांचीं ह्यावरचीं वचनें मोठी मार्मिक आहेत. ती वाचकांनीं संतांच्या ग्रंथांतूनच पहावींत. विस्तार फार होतो म्हणून तीं येथें देत नाहीं.

## आवरण आनंदाचें

आवरण होतें कां ? होतें. कशाचें आवरण होतें ? आनंदाचें. स्वतःसिद्ध प्रेमाचें. कुठें होतें ? ब्रह्मावर होतें, स्वरूपावर होतें. पहिल्या ऋचेंतील तिसऱ्या पादांतील प्रश्नांचीं उत्तरें हीं आहेत.

'हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ।
तत्त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये' ॥ ईश०

–हें सर्वांचें भरण पोषण करणारे भगवन्. सत्य स्वरुप असें आपलें मुख ज्योतिर्मय सूर्यमंडलरूप पात्रानें झांकलेलें आहे. सत्य धर्माचें अनुष्ठान करणाऱ्या मला आपलें दर्शन व्हावें म्हणून दीप्तिमान् असलेल्या आवरणाला आवरा.

'हिरण्मये परे कोशे विरजं ब्रम्ह निष्कलम् ।
तच्छुभ्रं ज्योतिषां ज्योतिस्तद्यदात्मविदो विदुः ॥
– मुंडक०

–निर्मल, अवयवरहित, निर्विकार अखंड परमात्मा प्रकाशमय परमकोशामध्यें विराजमान आहे.

श्री ज्ञानराज माउलींनी ह्या स्थितीचें फार मार्मिक वर्णन केलें आहे.

'जयासि गौसणी ब्रम्हरूपें देखिली ।
ते मी अंतरी पांघुरलो अंतरामाजि ॥ १ ॥
अंतरीचें सुख अंतरी निमालें ।
अंतर बैसविलें ब्रम्हपदीं ॥ ८६० ॥








बाप रखुमादेविवरू ब्रम्हपदी देखिला ।
मजमाजि सामावला अद्वैतपणें ॥२॥

**या ऋचेचा चवथा पाद–**

'तपसस्तन्महिनाजायतैकम् । किंवा
तमसस्तन्महिनाजायतैकम् ।'

आत्मानंद-आत्मरति-आत्मक्रीडेंत जगताची अभिव्यक्ति आहे. आत्मक्रीडेलाच भगवंताचें तप म्हणतात. असमाय आनंदांतच जगद्विलास चाललेला आहे. हेंच ज्ञानमय तप होय. हा जगद्विलास कसा चालला आहे यांचें वर्णन **श्रीज्ञानराज** माउलींच्या शब्दांत देतों–

१. 'चिंचेच्या पानिं एक शिवायिल उभविलें
आधीं कळस मग पायारे ।
देवापुजो गेलों तव देऊळ उडालें
प्रसिद्ध सद्गुरू रायारे ॥ १ ॥
संतजना महंतजना तेथील तें गुज गोड ।
अनुभव अनुभविलां कदांचि न सरे
पुरेल मनींचें कोड रे ॥ ध्रु. ॥
उपजत नवरी केळवली केळवला नोवरा नोवरी ।
पितया कंकण करि मातासुंदरी
विपरित माय कोडियाचीपरी ॥२॥
विपरीत कोडें गुरूगम्य कहाणी ऐके सगुण विरुळा ।
बापरखुमादेविवरू विठ्ठलु पाहता
पाविजे तो सुखसोहळा ॥ ३ ॥

२. वडाच्या पानि एक उभविलें देऊळ
आधि कळसु मग पाया हो ।
देव पुजो गेलें तव देऊळ उडालें
पान नाहीं तेंथें वडु रे ॥ १ ॥
चेत जाणा तुम्ही चेत जाणा ।
टिपरी वडाच्या घाई हो ॥ ध्रु. ॥
पाषाणाचा देवो पाषाणाचा भक्तु
पोहती मृगजळ डोही हो ।
वांझेचा पुत्र एकु पोहो लागला
तो तारी देवां भक्तां हो ॥ २ ॥
भवाब्धिसागरु नुतरवे ते पडिले रोहिणी डोही हो ।
न संपडे आत्मा बुडाले संदेही
ते गुंतले माया जळीं हो ॥ ३ ॥
विरुळा जाणें पोहते खुणें केला मायेसि उपावो हो।
बापरखुमादेविवरू विठ्ठल विसावा
तेणें नेलें पैल थडियें वो ॥ ४ ॥

चिंचेचे पान म्हणजे 'अनीदवात स्वधा, स्फुरण, स्वसंवेदन. व वडाचे पान म्हणजे–

'सूक्ष्माति सूक्ष्मं कलिलस्यमध्ये
विश्वस्यस्त्रष्टारमनेकरूपम् ( श्वेताश्वतर० )

परम सूक्ष्मापेक्षां सूक्ष्म हृदयामध्यें ज्याचा वास आहे व अनेक रूपांनीं नटलेलें विश्वाचें उत्पादक आत्मरूप होय.

३. भवाब्धि सागरीं मांडली टिपरी
परि अनुहते वाजे गजरु हो ।
तालक छंदे उमटती पदे वरि
टिपरे टिपरीं गाजे वो ॥ १ ॥
टिपरिया घाईं गोपाळभाई ।
घुलु घुलु पाई नादु वाजे ॥ ध्रु. ॥
तालक छंदे वेगु अल्हादे टिपरि नादे वाजति हो ।
सांडुनि अहं धरिले सोहं,
तयासि टिपरि साधली वो ॥ २ ॥
औट हात भूमिका नीट ताल छंदे टिपरि धरी हो ।
विरुळा जाणे एथिंचे खुणे
टिपरे वाजे शिरी हो ॥ ३ ॥
एकट संगे टिपरे वेगें ध्वनि गगनीं गाजे हो ।
बापरखुमादेविवर टिपरि गाजती
घाई जाली टिपरिया जोगी हो ॥ ४ ॥

'तपसस्तन्महिना जायतैकम्–तमसस्तन्महिना जायतैकम् ॥' हा सर्व ज्ञानविलास आहे.

'ज्ञानस्वरूपो भगवान्यतोऽसा
वशेषमूर्तिं न तु वस्तुभूतः ।
ततोहि शैलाब्धिधरादिभेदात्
जानीहि विज्ञान विजृम्भितानि ॥ विष्णुपुराण.

भगवान विष्णु ज्ञानस्वरूप आहे, म्हणून हें सर्वमय आहे. परिच्छिन्न पदार्थ नाहीं. म्हणून पर्वत, समुद्र, भूमि इत्यादि भेदाला तुम्ही एक मात्र विज्ञानाचा विलास समजा.

**श्रीज्ञानराजमाउली**

ज्ञानाचें गरोदर वाढलें परपुरुषें ।
व्यभिचारिणी ऐसे म्हणितले वो माय ॥ १ ॥
नव्हे व्यभिचारिणी नाहीं मज कोणी ।
पाहतां निर्वाणीं सहज जोडलें वो माय ॥ ध्रु ॥
निवृत्ति पुराडला देहभाव चोखाळला ।
अंगेसि मर्दिला ब्रह्मरसु वो माय ॥ २ ॥



अनुक्रमणिका






आतां उजरणी येई भ्रांति न लगे माझ्या चित्तीं ।
उजरणी सहज गति जालि वो माय ॥ ३ ॥
आतां असो हें बोलणें दुजे नाहीं मागणें ।
चिदानंदघन तेणें वाढलें वो माय ॥ ४ ॥
ऐसा देखणिया देखिला निज गुत प्रकाशला ।
तो रखुमादेविवरू मज फावला वो माय ॥ ५ ॥

आत्मस्वरूपावरच जगताचा विलास कसा आहे व त्यावर श्रीज्ञानराजमाउलींनीं कसां गमतीदार संवाद केला आहे, तो फार मोठा आहे पण तो येथें दिल्याशिवाय राहवत नाहीं म्हणून तो येथें देतों :–

"तुजपासाव जन्मलो हरी पुढति सामावलों तुझ्या उदरी ।
तुझिया व्यापकपणें चाले सत्कर्माची दोरी ।
साइ खडियाचे बाहुले कैसे हावमाव धरी ।
सूर्यकांते वेधे अग्नीच प्रसवे सहज
समंधु ऐसा धरी रया ॥ १ ॥
तुझें तुज सांगतां निके ।
समर्थासि केविं बोलावे रंके ॥ ध्रु० ॥
अहंकार महदादिभूतें गुणेसि आला तें चैतन्य नयनीं अधिष्ठिली ॥
सर्व शरीरी वायो व्यापिला कीं पृथ्वीसि मिळोनि आकाश भरोवरी झाली ।
तें हें स्थूल लिंगकारण तिही तत्वेंसी प्रकृति आथिली रया ॥ २ ॥
सर्व होणें तुज एकाचें ।
दुजेपण तेथें आणावे कैचे ॥ ध्रु० ॥
चंद्रमामनचक्षुसूर्योदिशाश्रोत अकारउकारमकार-प्रणवमनबुद्धिचित्त अहंकार । ब्रह्माविष्णुमहेश राजस-तामससात्त्विक माया ब्रह्मीचा दावी वुपावो । तुज वेगळे काय आहे तें सांगपा तरि मज कां म्हणवितासि चिऊरया ॥ ३ ॥
जेथें पाहे तेथें तूंचि दिससी ।
लपोनिया अबोला कासया धरिसी ॥ ध्रु० ॥
रसना रस सेवावे हें तों जीव आत्मयाची स्थिती ।
श्रवणी ऐकणें कीं नेत्रीं देखणें हेतो तुझीच नादश्रुति ।
घ्राणासि परिमळ घेणें कीं हस्तपादादिका चलगती ।
हें तों तुझीच पांचै तत्वें तरी तूं मज
कांभोगवितासी यातायातीं ।
लाजेसिना देवा माझे म्हणता ।
संन्यासा सवें कैची रे कान्ता ॥ ध्रु० ॥
इंद्रियें दारुणें जीव आत्मयासी हें तो सुखदुःख प्राप्ती ।
तेणें हें कारणं कीं आत्मापावे यातायाती ।
इंद्रियें दंडून तप जें करावें ऐसे बोलती वेदश्रुति ।
साहीजणासि वेवाद लाविला हे तो
तुझीच करणी सांगती रया ॥ ५ ॥
दुजेविण एकला खेळतो स्वारी ।
कवणातें जय कवणा आली हारी ॥ ध्रु० ॥
अंगे ब्रह्म जालासि उत्पत्ति करावया सृष्टी ।
तें समयीं रचिली विषयाची कसवटी ।
ऐसें तुझें वालभ मिरऊ जाय सृष्टी ।
तव सुखदुःख लागतसे पाठी ।
येथें काय माझा अपराध जाणसी तरि
शास्त्रेसि मान निवटी रया ॥ ६ ॥
सगुण रचना वोजा विस्तारिली ।
भुजंगी व्याली तिची काय जाली पिली ॥ ध्रु० ॥
वेद प्रमाण करावया कारण कीं कृष्ण मूर्तीची बुंथी घेणें ।
अनंत ब्रह्मादिकासी आदिवंद्य तो तूं राखसी गोधनें ।
अंबऋषि कारणें गर्भवास साहिले कीं
अजामिळादिकासी उद्धारणें ।
वैरियाभक्ता एकचि मुक्ति या समर्थ नाहीं
येणें मानें रया ॥ ७ ॥
अनंत ब्रह्मांडे घडिसी मोडिसी ।
अकर्तेपणें जैसा तैसा असती ॥ ध्रु० ॥
एक वीरें माय मारावी कीं गणिका उद्धरावी
हें कवण प्रवृत्ति ।
दशरथ पिता रौरवी कीं वैरिया सायुज्य मुक्ती ।
कर्मभ्रष्ट पांडव सरते केले कीं अज्ञासि मोक्षप्राप्ती ।
शास्त्रें पुराणें वारूजाय तंव अधिक
पडतसे गुंती रया ॥ ८ ॥
सुताचें गुंडाळें उगवी पा वहिले ।
खंडूनिया सांडि देवा एकाचि बोले ॥ ध्रु० ॥
मिथ्या हा प्रपंच की दर्पणाचे दुजे
जवळी बिंब प्रकाशें ।
एक साचे दुजे दिसे तैसेचि दुसरें कां प्रतिभासें ।
लटिके म्हणो जाय तंव तेथें मन कां विश्वासे ।
सगुण निर्गुण हें तों तुझीच माया तुझी
तुजमाजी दिसेरया ॥ ९ ॥
अर्धनारी सोंग पाहतां निके ।
साच लपऊनी दावितो लटिके ॥ ध्रु० ॥








सिद्धासि साधन हें तों कष्टचि वायाविण ।
अनंत प्रत्यक्ष जाणोन कायसे परिमाण ।
स्वयंभासि प्रतिष्ठा करणें हें तो देखताचि अज्ञानपण।
निजबिंबामाजी प्रतिबिंब बिंबले
तैसें सगुण निर्गुण तुजमाजीरया ॥ १० ॥
सहज सिद्ध तें तूं आपणपें पाही ।
बाहिजु भीतरी ये दोन्हीं नाहीं ॥ ध्रु० ॥
विश्वरुप अलंकारलें कीं मुसे आटली मांगारे ।
अथवा घटमठादिकी अभावी परिपूर्ण असिजे अंबरे ।
उदकीं पडिला कारिमरा तो नागवे नीरा
तो न सरे दुसरेपणें ।
तैसा आदिमध्य अंति हृदयींचा जाणोनि
पूर्ण बोधेवीण द्वैत नसरे ॥ ११ ॥
सच्चिदानंदरूपतत्त्वता ।
लटिकेचि बंधन बंधना मुक्ता ॥ ध्रु. ॥
म्हणसी माझा संकल्प फळला तरि म्या
दुःख नाहीं इच्छिलें ।
अवघा तुझा खेळ बहुरूप असें विस्तारलें ।
जाणसी ते करी देवा ते तुजपुढां सांगितले ।
तेथें काय माझा अपराध देखसी ।
तरी देह कां नाहीं खंडिले रया ॥ १२ ॥
पुरें पुरें आतां जड झालें जिणें ।
उरी नाहीं देवा लाजिरवाणें ॥ ध्रु. ॥
ऐसीं इंद्रियें वासनेसि आणिजती वें तुझी
तुजमाजी सामावती. ।
समस्त जीवन हें तों तुझें आकारलें
येरी तें लटकीच भ्रांती ।
जाणसी तें करी देवा तेंचि तें सांगो किती ।
दग्धबीज तरूबीजी सामावला तैसा
तुजमाजी श्रीगुरु निवृत्तिरया ॥ १३ ॥
ऐकोनि जाले तेथें नित्य दिवाळी ।
सहज समाधि तेथें कायासि रे टाळी ॥ ध्रु. ॥

प्रा. मु. गो. देशपांडे

# प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर

महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनांत चैतन्य निर्माण करणाऱ्या थोर पुरुषांमध्यें प्रो. वि. गो. विजापूरकर यांची गणना कै. वि. का. राजवाडे प्रभृति विचारवंतांनीं केली आणि आजहि कै. विजापूरकर यांच्या नांवाबद्दल कमालीचा आदर बऱ्याच मोठ्या प्रमाणांत आढळतो. समर्थ विद्यालयानें महाराष्ट्राच्या जीवनावर न बुजणारा ठसा उठविला आहे. राष्ट्रीय शिक्षणाची गंगोत्री म्हणून समर्थ विद्यालयाच्या स्थापनेकडे व त्या विद्यालयाच्या आहुतीकडे इतिहासकार बोट दाखवितात. त्या विद्यालयांतील पदार्पणानें महाराष्ट्राला ज. स. करंदीकर, वा. म. जोशी, महादेवशास्त्री दिवेकर, दिनकरशास्त्री कानडे, डॉ. पी. के. गोडे, प्रभृति विद्वान् आणि निष्ठावंत कार्यकर्ते दिले आहेत. कारखानदार किंवा उद्योगपति यांनाहि त्या विद्यालयानें राष्ट्रीय व स्वाभिमानी दृष्टि दिली आहे. देशाच्या स्वातंत्र्यलढ्यांत त्या विद्यालयांतील तरुणांनीं स्वतःचा होम करून घेतला आहे. गांधी युगांतील राष्ट्रीय शिक्षणाची दिशा आणि समर्थ विद्यालयाची राष्ट्रीय शिक्षणाची दिशा यांत जरी बराच मोठा फरक पडला होता तरीदेखील समर्थ विद्यालयांतील शिक्षण समाजमानसावर गडद होती यांत शंका नाही.

## कोल्हापुरांतील वातावरण

कै. विजापूरकर यांच्या समर्थ विद्यालयाचें हें अनन्य साधारण स्थान आधुनिक महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास लिहिणाऱ्यांनीं अवश्य ध्यानीं आणलें पाहिजे. अद्यापपर्यंत तसें कोणी केल्याचें आढळत नाही, परंतु राष्ट्राची खरी ओळख पटण्यासाठीं हे अन्तःप्रवाह समजून घेणें व त्या अन्तःप्रवाहाचीं शक्तिकेंद्रें किंवा उगमस्थानें कोणतीं तें समजून घेणें अवश्य आहे. याचबरोबर कै. विजापूरकर यांच्या एकंदर जीवनाचा व त्यांच्या लेखसंग्रहाचा अभ्यासहि अवश्य आहे. समर्थ विद्यालय हें विजापूरकर यांच्या शेवटच्या वीस वर्षांतील कार्य होय. त्याआधीं त्रेचाळीस वर्षें ते कोल्हापुरांत विविध कार्यांत गुंतलेले होते आणि मुख्यतः ग्रंथमाला व विश्ववृत्त आणि समथ हीं नियतकालिकें धडाक्यानें चालवीत होते. त्या कार्याची ओळख विजापूरकर यांचें चरित्र लिहिणाऱ्या दोन्हीहि लेखकांनीं जेवढी करून घ्यायला पाहिजे होती तेवढी घेतलेली दिसत नाहीं. कै. विजापूरकर यांच्या कोल्हापुरांतील वास्तव्यांत कोल्हापूरचें वातावरण कसें होतें व महाराष्ट्रीय जीवनावर त्याचे काय परिणाम घडलेले आहेत हाहि एक असाच महत्त्वाचा परंतु न अभ्यासिलेला विषय आहे असें वाटतें. ठोकळ मानानें आपण शाहू छत्रपति कोल्हापुरांत तेव्हां प्रभावी होते व त्यामुळें पुणें आणि कोल्हापूर यांचें एकमेकांशीं वैर होतें असें मानतों. ही समजूत नीट तपासून घेतली पाहिजे. रॅन्डचा खून करणारा चाफेकर हा लो. टिळकांना ‘ हरहर न हिन्दु नें यवनः ’ या कोटींत ढकलत असे; व त्यांच्या लेच्यापेच्या सनातनी बाण्याबद्दल त्यांना दूषण देत असे. उलट कोल्हापुरांतील त्यावेळी गाजलेल्या शिवाजी क्लबाचे प्रमुख श्री. हणमंतराव कुलकर्णी मिशनऱ्याविरुद्ध हिंदुधर्माचें रक्षण करण्याकरितां सिद्ध झाले असले तरी त्यांच्या क्लबांतील शेदीडशें मुलें हिंदुमुसलमान किंवा स्पृश्य-अस्पृश्य भेदभाव न पाळतां “ एकत्र खातपीत. ” हें केवळ एक उदाहरण झालें. अनेक रीतीनें असें दाखवून देतां येईल कीं कोल्हापुरांतील त्यावेळचें जीवन व वातावरण हें महाराष्ट्रीय आधुनिक इतिहासाची घडण बनवीत होतें.

## व्यक्तिमत्त्व व लेखनकार्य

कै. विजापूरकर यांच्या लेखांवरून व कोल्हापुरांत जें अल्पसें कार्य ते त्यावेळेपर्यंत करूं शकले त्यावरून त्यांचें व्यक्तिमत्त्व कशा प्रकारचें होतें याचा अंदाज करतां येईल. चरित्रकारांनीं आणि आठवणी सांगणाऱ्यांनीं त्यांच्या ऋषितुल्य व निस्सीम स्वार्थत्यागी जीवनाबद्दल बरेचसें लिहिलें आहे. या प्रयत्नांत गेलीं






# प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर

चार वर्षें कांहीं नवीन माहिती मिळवीत असतांहि ज्या ज्या थोर व्यक्तींना मी भेटलों त्यांनीं कै. विजापूरकरांबद्दल अतिशय आदरभावनेनें आणि हृदय ओतून आपल्या आठवणी सांगितल्या आणि त्या अद्यापि प्रकाशित न झालेल्या अशाच आहेत. उदाहरणार्थ, कराडला श्री. शिराळकर यांच्याकडे गेलों असतां त्यांनीं सांगितलेली आठवण फारच हृद्य होती. समर्थविद्यालयांत श्री. शिराळकर शिकत असतांना त्यांची मुंज ठरली व त्याप्रमाणें सुबक पत्रिका छापून व मुद्दाम आग्रहाचें निमंत्रण करून कै. अण्णांना ( विजापूरकरांचें त्यांच्या विद्यार्थीवर्गांतील व इतर परिचितांतील नांव ) पाठविली. ती पत्रिका कै. विजापूरकरांनीं परत पाठविली व विचारलें कीं देशी कागदावर पत्रिका कां नाहीं छापून घेतल्या ? नंतर श्री. पांडुअण्णा शिराळकर यांनीं पुन्हां देशी कागदावर पत्रिका छापून घेतल्या व अशा रीतीनें कै. विजापूरकरांचें समाधान झालें. किंवा दुसरी एक आठवण डॉ. पटवर्धन, राष्ट्रीय कीर्तनकार यांनीं अगदीं हुंदके देऊन परवांच सांगितली ती देखील तितकीच हृद्य आहे. समर्थ विद्यालय बंद पडलें तें पुन्हां सुरू होईपर्यंतचीं आठ वर्षें कै. विजापूरकर फक्त एक प्रकारचें अन्न घेत असत. त्यांची शिस्त आणि स्वतःलाहि ती शिस्त लावून घेण्याची मनाची थोरवी एवढी कीं एकदां जेवतांना त्यांना कांहीं कामामुळें दहा मिनिटें पानावर यायला उशीर झाला व वाढलेला भात अगदीं गार झाला परंतु इतरांनीं कितीहि आर्जवें केलीं तरी त्यांनीं तो बदलूं दिला नाही आणि गरम भात घेतला नाही. अशा अनेकांनीं अनेक स्वरूपाच्या त्यांच्या विविध गुणांवर प्रकाश टाकणाऱ्या आठवणी सांगितल्या आहेत. खुपेरकर शास्त्री यांनीं सांगितलेली आठवण हें या बाबतींतलें शेवटचें उदाहरण म्हणून देतों. विजापूरकरांचा एकुलता एक मुलगा विषमज्वरानें रात्रीं वारला. परंतु दुसऱ्या दिवशीं नेहमीप्रमाणें विजापूरकर विद्यार्थ्यांना सकाळीं शिकवावयास तयारच. विद्यार्थीच वाईट वाटल्यामुळें आले नाहीत तर विजापूरकरांनीं त्यांना बोलावणें पाठवून या कामीं खंड पडूं दिला नाही. या धर्तीच्या अनेक आठवणी कानडे यांनीं आपल्या ग्रंथांत एक स्वतंत्र खंड म्हणून दिल्या आहेत. परंतु विजापूरकर यांचे लेख किती महत्त्वाचे आहेत व त्या लेखांतून प्रकट झालेले विजापूरकर कसे दिसतात हें पाहाणें अजूनपर्यंत कोणीहि केलेलें नाही. मराठीच्या एका मोठ्या मानकऱ्याचे हे लेख संग्रहित रूपानें वाचकांपुढें येण्याची नितांत आवश्यकता आहे.

विजापूरकरांच्या नियतकालिकांतून लिहिणाऱ्या इतर त्या मानानें किरकोळ अशा लेखकांच्या लेखांचे स्वतंत्र संग्रह उपलब्ध आहेत ओडल्मने नांवाचे लेखक होऊन गेले, त्यांचा लेखसंग्रह आहे; आगाशांचा लेखसंग्रह प्रकाशित झाला आहे; परंतु खुद्द विजापूरकरांनीं बरेचसें लिहिलें असलें तरी त्यांचा निवडक लेखसंग्रह निघूं नये ही घटना मराठी जिज्ञासेच्या दृष्टीनें भयावह आहे. विजापूरकरांच्या शतसंवत्सरीचा काळ आतां समीप आला आहे. १९६३ सालीं त्यांची जन्मशताब्दि येते. म्हणून असें सुचवावेसें वाटतें कीं समर्थ विद्यालयाचे आजचे विश्वस्त, विजापूरकरांचे कित्येक सुस्थितींत असणारे विद्यार्थी आणि त्यांच्या कार्याची थोरवी ओळखणारे सज्जन यांनीं या कामीं साहाय्य करावें.

विश्ववृत्तांतील सर्व महत्त्वाचे लेख आणि ग्रंथमालेंतील 'सारसंकलनं' व 'सालअखेर' या दोन सदरांमधून कै. विजापूरकर यांनीं केलेलें लेखन हीं आतां मी मिळविलीं आहेत. ग्रंथमालेतील सर्वच्यासर्व मजकूर अद्यापि हातीं आला नाही. तथापि बरेचसे लेख मिळाले आहेत व आणखी मिळविण्याच्या मी प्रयत्नांत आहे.

यांपैकीं ग्रथित करण्याच्या योग्यतेचे लेख 'ग्रंथमालेचा उपोद्घात', पहिल्या वर्षाच्या अखेरीचे 'सालअखेर', 'संमेलनें', 'विद्यार्थी वसतिगृह', ग्रंथमालेचा ९६ वा अंक व त्यांतील राजाश्रय नाहीसा झाल्याचा उल्लेख, 'काळाची वक्रदृष्टि,' 'केकावलि', 'ब्रह्मीभूत विवेकानंद' 'हिंदुस्थानांतील मागासलेल्या वर्गांचें शिक्षण', भाषाशुद्धि', 'अहमदाबाद येथील प्रदर्शन', 'जगाची एक भाषा' 'प्रो. श्रीधर गणेश जिनसीवाले, यांजवरील मृत्युलेख', 'शिक्षण व देशीभाषा', 'हिंदुधर्म-सनातनधर्म', 'सारसंग्रह' ( ग्रंथमाला अंक १४२ ) हे तर आहेतच. आणखीहि कितीतरी महत्त्वाचे लेख या रूपानें ग्रंथमालेच्या जुन्या अंकांतून वाळवीच्या भक्ष्यस्थानीं पडत असावेत. विश्ववृत्तांतील निवडक लेखांपैकीं 'भारतीय विश्वविद्यालय', 'मराठी

ग्रंथकर्तृत्वाची योग्य दिशा', 'टिळक अध्यक्ष कां नकोत?', 'राष्ट्रीय सभा', 'राष्ट्रीय शिक्षण स्वदेशी चळवळीचें प्रधान अंग आहे', 'संस्थानी राज्यकारभार' 'हिंदुएज्युकेशन फंड' 'मिलाफ होणें अशक्य आहे काय?' 'बॉम्ब गोळे प्रकरण' वगैरे लेख आजहि मननीय आहेत. एका कालखंडाचा इतिहास तपासण्याच्या दृष्टीनें या लेखांचें मोल फारच मोठें आहे परंतु हे लेख आज एकत्रित करणें देखील कठीण झालें आहे. समन्वयबुद्धि, राष्ट्रप्रेम, सुसंस्कृतता, विद्येबद्दलची गाढ गौरवभावना, स्वदेशीच्या व्रताचा कठोर अंगीकार, इतिहास आणि भारतीय परंपरा याबद्दल जाज्वल्य अभिमान, निगर्वीपणा, लोकसंग्रह करण्याची वृत्ति, शालीनता, संस्थानी राज्याबद्दल मनांतून कमालीचा आदर, ब्रिटिश राज्यापेक्षां संस्थानी राज्याबद्दल प्रेम, उद्योगशीलता या विजापूरकरांच्या गुणांचें प्रतिबिंब या लेखरूपी आरशांतून कोणालाहि पाहावयास मिळेल.

मराठी भाषेच्या श्रेष्ठतेविषयीं आणि तिच्या महत्त्वाविषयीं विजापूरकरांनीं ग्रंथमालेच्या पहिल्या अंकापासून ग्वाही दिली आहे. त्यांचें मातृभाषाप्रेम या लेखांतून प्रतीत होतें हें म्हणणें अनावश्यक आहे. त्यांचा व्यासंग कसा वाढीस लागला, स्वदेशीचें व्रत कसें दृढतर होत गेलें, शाहूमहाराजांची अवकृपा झाली असतांहि धैर्य कसें बळावलें, दृष्टि अधिकाधिक राष्ट्रीय कशी होत गेली, समन्वयबुद्धि आणि सुसंस्कृतता यांची जोपासना त्यांच्या मनःपिंडानें कशी केली हा आन्तरिक इतिहास या लेखांतून पाहावयास मिळतो हें या लेखसंग्रहाचें खरें वैशिष्ट्य आहे. त्यांच्या मनाला जी प्रगल्भता आली आणि कार्याला स्थिरता आल्यानें जी स्थितप्रज्ञ वृत्ति निर्माण झाली तिचेंहि दर्शन या लेखावरून घडून येणारें आहे.

मद्रासच्या राष्ट्रीय सभेला प्रेक्षक या नात्यानें गेलेल्या विजापूरकरांनीं तेथल्या औद्योगिक प्रदर्शनासंबंधीं लिहितांना म्हटलें आहे कीं, "उपयुक्त व गरीब मध्यम स्थितींतील लोकांस हरहमेषा वापरण्यास लागणारे जिन्नस फारच थोडे होते. उदाहरणार्थ आमच्या धंद्या-
म्हांस लागणारें सामान मातीच्या दऊती,
टांक, कागद, सुया, टांचण्या, चाकू,
ब्रश, शिस्पेनी, मेणबत्त्या असे जिन्नस बिल-
ले नाहींत...... अहमदाबादच्या प्रदर्शनाच्या वेळीं दोन टांकाचीं टोकें बडोद्यांतील भागांतून मिळविलीं होतीं, त्यापैकीं एक मोठ्या कौतुकानें कोरें राखून ठेवलें आहे. त्याच्या जोडीस मद्रासेस मिळेल म्हणून मोठ्या हौसेनें सर्व प्रदर्शन धुंडाळलें; पण व्यर्थ." या प्रदर्शनांतील वस्तूंची यादी प्रत्येक देशभक्ताजवळ असावी व त्यानें स्वदेशी वस्तूच विकत घ्यावी आणि जी वस्तु स्वदेशी नसेल ती घेऊं नये एवढें दमन करावें असें विजापूरकरांनीं या संदर्भात लिहिलें आहे. १९०३च्या या उद्गारांना शेवटी आचाराची एवढी दृढता आली कीं मुंबईच्या पावसांत घोंगडी व इरलें घेऊन हिंडण्यापर्यंत विजापूरकरांची मजल गेली असें त्यांच्या चरित्रकारांनीं म्हटलें आहे.

प्रो. श्रीधर गणेश जिनसीवाले यांच्या मृत्युलेखांतहि असें आत्मनिवेदन आलेलें आहे तें पाहण्यासारखें आहे. किंबहुना तो लेख कोणत्याहि गद्यवेंच्यांत समाविष्ट व्हावा इतका प्रासादिक व घाटदार उतरला आहे. ठराविक लेखकांचीं ठराविक पुस्तकें चाळून गद्यवेंचे तयार होत आहेत तोंपर्यंत हें दुर्लक्ष्य अटळ आहे. जिनसीवाल्यांच्या अमोघ वक्तृत्वशैलीविषयीं आणि देशप्रीतीविषयीं लिहून विजापूरकरांनीं स्वतःची एक आठवण या लेखांत दिली आहे. "प्रस्तुत लेखकाचा या थोर पुरुषाशीं प्रथम संबंध परीक्ष्य परीक्षकाचा आला. त्यावेळीं खाजगी भाषणाचें अर्थात् प्रयोजन नव्हतेंच. पण पुढें तो बी. ए. झाल्यावर सुमारें चार महिन्यांनीं ते करवीरास आपल्या एका स्नेह्याकडे आले असतांना त्यांस मुद्दाम भेटावयास गेला. त्या पहिल्या भेटींत तीन वर्षांपूर्वींची आठवण काढून मोठ्या प्रेमानें त्यांनीं जें भाषण केलें, त्याचें विस्मरण अशक्य आहे. परंतु त्यांतला सार्वजनिक उपयोगाचा एकच चुटका येथें देतों. त्यांनीं असा प्रश्न विचारला कीं, 'तुम्ही रामायण महाभारत कांहीं वांचलें आहे कीं नाहीं?' त्यावर उत्तर केलें कीं, "नुकताच या परीक्षांतून सुटलों आहे. हे ग्रंथ साग्र वाचण्याचा मी संकल्प केला आहे. होईल तेव्हां खरें." पुढें विचारलें, 'मनु तरी वाचला आहे काय?' त्यावर तो म्हणाला कीं 'धर्मशास्त्र कांहीं मी घेतलें नाहीं.' 'तें खरें हो पण तुम्ही हिंदु तरी आहांना? प्रत्येक संस्कृत जाणणारानें तो ग्रंथ एकवार तरी अवश्य वाचावा व आपल्या लोकांनीं तर वाचावाच. या बोलण्याचा परिणाम इतका झाला कीं, मानवधर्मशास्त्र

पैदा करून तें पुस्तक संपवीपर्यंत दुसरें कांहीं संस्कृत अक्षर प्रस्तुत लेखकानें वाचलें नाहीं." यावर अधिक भाष्य करण्याची जरूर नाहीं.

ग्रंथमालेचा आठव्या वर्षाचा शेवटचा अंक अतिशय उद्बोधक असून ग्रंथमाला आठ वर्षे चालूनदेखील तिचे एक हजार ग्राहक झाले नाहींत याबद्दल खेद वाटूं न देतां, किंवा शाहू महाराजांनीं दिलेला आश्रय संपुष्टांत आला म्हणून न डगमगतां परंतु योग्य त्या शालीनतेनें व कृतज्ञता बुद्धीनें महाराजांनीं आजपर्यंत केलेल्या साहाय्याचें उदार स्मरण करून विजापूरकरांनीं वाचकांस ग्वाही दिली आहे कीं अनेकांचें साहाय्य ग्रंथमालेला मिळत आहे व म्हणून ती चालू ठेवण्याचें ठरविलें आहे.

## लो. टिळक, शिवरामपंत परांजपे व विजापूरकर

मराठी वाङ्मयांत पदार्पण करणाऱ्या महत्त्वाच्या व्यक्तीला केव्हां ना केव्हां तरी कठोर टीकेच्या टाकीचे घाव सोसावे लागतातच. त्याप्रमाणें आपल्या संपादकीय कारकीर्दींत खुद्द विजापूरकर यांच्या वाट्याला लोकमान्य टिळकांशीं व शिवराम महादेव परांजपे यांच्या वक्रोक्तिपूर्ण धारदार टीकेशी सामना द्यावा लागला. आणि विजापूरकरांनीं अतिशय निर्धारानें सौजन्यानें व तत्त्वनिष्ठेनें तो लढा दिला आहे हें समजल्यानंतर तर आधुनिक मराठी वाङ्मयांतील अपप्रवृत्तींना आळा घालण्याच्या कामीं विजापूरकरांच्या श्रमांची दखल घेणें इतिहासकारांना भाग पडेल.

लो. टिळकांनीं विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या निधन तिथीच्या दिवशीं सद्वर्तन प्रसारक मंडळीपुढें एक निबंध वाचला होता. त्या निबंधांतील नीतिबंधांच्या पालनामुळेंच बहुजनसमाजाची मान्यता मिळूं शकते वगैरे प्रतिपादनाबद्दल लो. टिळकांची प्रशस्ति केल्यानंतर चिपळूणकरांच्या भाषाशैलीबद्दल लो. टिळकांनीं समतोलपणा न ठेवतां जें उद्गार काढले आहेत त्याबद्दल विजापुरकरांनीं कटाक्षानें नापसंती व्यक्त केली आहे. यासंबंधीं विजापूरकर म्हणतात, "शास्त्रीबोवांचे लेख मेकॉले सारखे आहेत हाच आक्षेप आहे. म्हणजे मेकॉलेचे गुण व दोषहि त्यांत आहेत. यांचें निरसन करतांना रा. रा. टिळक म्हणतात, ते तसेच आहेत व असले पाहिजेत. म्हणजे त्यांच्या मतें मेकॉलेचे लेख व लेखनपद्धतीच उत्तम असें होतें. हें विधान सर्वांस पसंत पडेल असें नाहीं. आम्हांस तर तें सद्वर्तनाच्या प्रचारास विघातक आहे असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. "कित्येक लोकांची अशी समजूत आहे कीं, चांगला लेख कोणता, तर ज्यांत दोहों पक्षांचा समतोलपणा राखून कोणासहि न दुखवितां दरबारी रीतीनें विषयाचें विवेचन केलेलें असतें." चांगल्या लेखाची ही व्याख्या आम्हांस पसंत असल्यानें तिच्याविरुद्ध उपदेश केलेला पाहून त्याचा निषेध केल्याशिवाय राहणें बरें नव्हे असें वाटल्यावरून दोन शब्द लिहिण्यास आम्ही प्रवृत्त झालों आहो." या लेखाच्या पुढील भागांत विजापूरकरांनीं मोठ्या शालीनतेनें टिळकांचे कोटिक्रम त्यांच्यावर उलटविलेले आहेत. १९०१ सालच्या मार्च महिन्याच्या ग्रंथमालेतील सारसंग्रहांत हें सदर 'कै. वि. कृ. चिपळूणकर' या शीर्षकानें विजापूरकरांनीं लिहिलें असून चिपळूणकरांवरील टीकावाङ्मयांत या लेखाची दखल घेण्याच्या योग्यतेचें तें आहे हें निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

जी गोष्ट लो. टिळकांशीं दोन हात करण्याची तीच गोष्ट काळकर्ते शि. म. परांजपे यांच्याशीं घडलेल्या वादाची होय.

इंग्रज राज्यकर्त्यांचे हेतु संस्थानिकांचे अपमान करावेत असे असतात, इंग्रज हे येथूनतेथून सारखेच, त्यांच्यामध्यें शुद्धभाव, शुद्धाचार व खरेपणा या गोष्टींचा पूर्ण अभाव आहे असा ग्रह एकूण एक हिंदी जनतेचा व्हावा व द्वेषबुद्धीनें प्रेरित होऊन आपण इंग्रजांच्या प्रत्येक वृत्तीकडे साशंकतेनें पाहावें अशी शि. म. परांजपे यांची जी शिकवणूक होती ती किती अपायकारक व बुद्धिभ्रंश करणारी ठरेल हें सांगतांना विजापूरकर म्हणतात, 'इंग्लंडामधील चांगल्या माणसांचीं चरित्रें ज्यांनीं वाचलीं नाहींत, इंग्रजी वाङ्मयांतील उदार विचार ज्यांच्या स्वप्नांतहि आले नाहींत, अशा एखाद्या माथेफिरूनें असलीं तर्कशास्त्रबाह्य विधानें ठोकून दिलीं तर शोभेल; पण आमच्या आक्षेपकांच्या विद्वत्तेच्या माणसांनीं असें लिहिणें किंवा बोलणें म्हणजे लोकमनोरंजनाच्या इच्छेनें एका मोठ्या राष्ट्राची अब्रूनुकसानी करणें आहे. त्या राष्ट्रांत याहूनहि अधमपणानें आमच्या राष्ट्राची अब्रूनुकसानी ज्यांनीं केली आहे,







असे लेखक व वक्ते आम्हांस माहीत नाहींत असें नाहीं. त्यांच्याविषयीं लिहितांना योग्य ती कडक भाषा आमच्या सामर्थ्याप्रमाणें योजण्यास कमी करूं किंवा करतों असेंहि नाही; परंतु टका शेर भाजा आणि टका शेर खाजा या तत्त्वावर सर्व इंग्रज राष्ट्राची निंदा किंवा विटंबना करणारा कोणी भेटला तर आम्ही क्षमा करणार नाहीं. बर्क, ब्राईट, फॉसेट, ब्रॅडला, ह्यूम, डिग्बी, वेडर्बर्न, रिपन, रे, यांचें कर्ज आम्ही कसें फेडणार? आम्हांपासून कोणत्याहि प्रकारची किफायत नसतां व उलट स्वजातीयांचा द्वेष संपादन करण्याची खात्री असतां ज्या लोकांनीं केवळ सत्य स्मरून आमची कड घेतली, त्या राष्ट्राची सरसकट निंदा केलेली ऐकून किंवा वाचून आम्ही स्वस्थ बसलों तर आम्हांस परमेश्वराचे घरीं कोणी विचारील काय ?

छत्रपतींना ' शिळा छत्रपति ' असे अवहेलनेचे शब्द काळकर्त्यांनीं वापरले होते त्या संदर्भात विजापूरकर संस्थानिकांची कड न घेतां परंतु योग्य त्या युक्तिवादानें विचारतात कीं, दादाभाईंना 'काळा' माणूस म्हटल्याबद्दल जर आमची तळपायाची आग मस्तकास पोहोंचते तर शिवाजीच्या गादीचा उपमर्द करण्यास उद्युक्त होतांना आपण थोडातरी विचार करूं नये काय? शाहूछत्रपतींनीं ग्रंथमालेचा आश्रय काढून घेतला ही अंतःकलहाची बाब आहे हें बजावून विजापूरकर लिहितात कीं, " असले अनुदार उद्गार आम्हांस खपणार नाहींत. आमच्या संस्थानांत उत्पन्न होणारा पैसा साता समुद्रापलीकडे जात नाहीं, त्याचा दुरुपयोग झाला तरी फिरून प्रायः तो परत प्रजेंतच पसरतो. अशामुळें मुळींच सर्व नकाशा तांबडा लाल झाल्यापेक्षां छत्रपति असतील तितके पाहिजे आहेत. " या संदर्भात वाचकांनीं हेंहि ध्यानांत ठेवावें कीं त्याकाळीं बऱ्याच विचारवंतांची समजूत अशी होती कीं संस्थानें आहेत ही एकपरीनें स्वराज्याचीच खूण आहे. त्यांच्या राजवटीला लोकहितदक्ष असें स्वरूप प्राप्त करून द्यावें, त्यांच्यांत जागरूकता आणि एकसंघता आणावी, स्वदेशप्रेमानें त्यांना भरावें आणि योग्य त्या सुधारणा संस्थानी राजवटींत घडवून आणाव्या म्हणजे स्वराज्य दृष्टिपथांत येण्याला उशीर लागणार नाहीं. राजवाडे यांचें याविषयींचें मत त्यावेळीं फारसें निराळें नव्हतें हें त्यांच्याहि लेखांवरून समजण्यासारखें आहे. नाकर्त्या संस्थानिकांबद्दल अनुदार उद्गार काढणारे त्यावेळचे विचारवंत संस्थानें नष्ट व्हावींत या मताचे नव्हते. काळकर्त्यांच्या भयंकर प्रक्षोभाला बळी पडलेले विजापूरकर आपल्या लेखाचा शेवट कसा करतात तेंहि पाहाण्यासारखें आहे. ' आक्षेपकांच्या विरुद्ध मत प्रकाशित करण्याचें घोर महापातक करण्याचें साहस केल्यावर मग आम्हांला क्षमा कोठून होणार? क्षमा राहिली, सरळ व समर्पक टीका तरी कोठून मिळणार? आपल्या सर्व वक्रोक्तिरूप पाशुपत अस्त्रांचा वर्षाव करून आम्हांस जमीनदोस्त केलेंच पाहिजे. आमच्या लेखांतला एखादा उतारा घेऊन तो नवीन विरामचिन्हें देऊन व त्यांतील सरळ कार्यकारणभावांचा विपर्यास करण्यासाठीं त्याचें डोकें पायाखालीं, हात पाठीमागें, पोट कंबरेखालीं अशी भिन्नक्रम रचना दाखवून आपलें विध्वंसकौशल व्यक्त केलें पाहिजे. आणखी वर सत्याचा, प्रामाणिकपणाचा, निस्पृहपणाचा, राज्यकर्तृदर्पदलनाचा आणि सगळ्यावर कळस म्हणून स्वदेशाभिमानाचा मक्ता आपणाकडे आला आहे असें जगास ध्वनित करून दाखविलें तर तितकी समजूत वाचकांच्या सामान्य डोक्यांत असेल नसेल म्हणून स्पष्ट वाच्य करून दाखविलें पाहिजे. असा कृतनिश्चय झाल्याशिवाय कालतूणीरांतून बिचाऱ्या निराश्रित ग्रंथमालेवर व ग्रंथमालाकारावर असला ( असमंजस उत्प्रेक्षेकरतां अर्थान्तरन्यास ) लेखसायक सणसणून सुटला नसता.

आमच्या लिहिण्यांतील कांहीं वाक्यें घेऊन त्यांच्या अर्थाची ओढाताण करून, नुसती आपल्या गिन्हाइकांची करमणूक करून देण्यांत, ती करमणूक करणारांस व करून घेणारांस आनंद व समाधान वाटलें इतक्याच पल्ल्यावरची ही गोष्ट असती तर या प्रकरणीं आम्ही एक टांकहि ओढला नसता. परंतु प्रतिष्ठित गृहस्थांनीं चालविलेलें वर्तमानपत्र म्हणजे तमाशांतील नाच्या पोर किंवा नकल्या हरिदास नव्हे. त्याच्यावर सत्यमतप्रचाराची कांहीं जबाबदारी आहे. चांगल्या प्रकारचें शिक्षण देणें हें त्याचें कर्तव्य आहे. भलतेच विचार गुलजार भाषेच्या जोरावर व अप्रयुक्त नाही तर अप्रयोजक शब्दांनीं व कल्पनातरंगांनीं सामान्य जनांच्या डोक्यांत घालणें हें निंद्य व विघातक आहे, व राष्ट्रास झपाट्यानें अवनतीप्रत नेणारें आहे; असा आमचा मनापासून ग्रह असल्याकारणानें हें विवेचन करण्यास

आम्हीं प्रवृत्त झालों. कोटीवर कोटी लढवून वादाच्या भोंवऱ्यांत सांपडणें ठीक नाहीं हें आम्हीं जाणून आहों. म्हणून या बाबतीत हाच शेवटचा शब्द लिहून आमच्या आक्षेपकांस नमस्कार करितों."

विजापूरकर यांच्या लेखसंग्रहांत धर्मविषयक, राजकीय, शिक्षणविषयक, भाषाशुद्धिविषयक असे अनेक महत्त्वाचे लेख समाविष्ट होऊं शकतील. त्या लेखांचा परिचय करून देणें एका लेखांत शक्य नाहीं. परंतु शेवटीं महत्त्वाच्या एका विषयावरील विजापूरकरांचे विचार आजच्या वाचकांपुढें ठेवून हा उपक्रम सध्यां पुरा करतों.

## हिंदुधर्माचें लक्षण

लो. टिळकांनीं हिंदुधर्माचें लक्षण सांगतांना एका व्याख्यानांत असें म्हटलें होतें कीं,

प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु साधनानामनेकता ।
उपास्यानामनियम एतद्धर्मस्य लक्षणम् ॥

यासंबंधीं विजापूरकर लिहितात कीं, टिळकांच्या मतें मुसलमान, ख्रिस्ती वगैरे धर्म त्या लक्षणाखालीं येऊं नयेत. त्यांच्या मतें 'आर्यसमाज' मात्र या लक्षणांत येतो पण प्रार्थनासमाज येत नाहीं. त्यांनीं केलेल्या विवरणाप्रमाणें या लक्षणश्लोकाचा अर्थ केला तर त्या धर्मास सनातनधर्म या थोर पदावर बसवितां येणार नाही. तेंच वेद याचा अर्थ ईश्वरप्रणीत ग्रंथ असा सामान्य घेतला म्हणजे कुराण व बायबल ह्यांहि ग्रंथांचा समावेश होईल. ख्रिस्त व महंमद आदिवरून साधूंचा योग्य आदर केलासें होऊन त्यांचें ठायीं ईश्वरांशत्व कबूल करण्यास प्रत्यवाय राहाणार नाहीं. खरें पाहतां आमच्या येथील नेटिव्ह जनरल लायब्ररींत रा. रा. वामन रामचंद्र जोशी बी. ए. संपादक समर्थ व आर्यन एज्युकेशन सोसायटीचे लाईफ मेंबर यांचें 'मानवीसुख वाढविण्याचीं साधनें' या विषयावर झालेल्या व्याख्यानांत त्यांनीं दर्शविलेली आर्यधर्माची कल्पना याच व्यापक तत्त्वास अनुसरून होती. त्यांच्या मतें व्यक्तीचें नांव धर्मास देणें हें सर्वथा अनुचित. ख्रिस्ती धर्म, महंमद धर्म हें म्हणणें गैरवाजवी आहे. जितके धर्म म्हणून म्हणतात तितके खरोखर पंथ होत. ते एका धर्माच्या शाखा होत. खरा धर्म एक आहे. तेथें अनेक उपास्य देवतांचे उपासक एकत्र प्रेमानें वागण्यास हरकत नाहीं. याच तत्त्वाचा अंगीकार करून सर्व जग सनातन धर्माचें होईल अशी आशा आहे. या दृष्टीनें पाहतां पुढच्या श्लोकांत सनातनधर्माची कल्पना येण्याजोगें लक्षण सांपडेल.

भूतेषु समदृष्टित्वमीश्वरे शरणागतिः ।
तद्विभूतिषु पूज्यत्वमेष धर्मः सनातनः ॥

भिन्न आचारांनीं, भिन्न उपासनामार्गांनीं, भिन्न समाजव्यवस्थांनीं धर्मभिन्नता होण्याचें कारण नाहीं. द्वेषभाव वाढण्याचें किंवा अमकाच मुक्ति मिळविणार व दुसरा अधोगतीप्रत जाणार अशा उच्चनीच भावास थारा मिळणार नाहीं."

इतक्या संपन्न विचारांचा व विविधतेनें नटलेला लेखसंग्रह ग्रंथरूपानें मराठी वाचकवर्गास उपलब्ध करून देऊन विजापूरकरांचें ऋण फेडणें अवश्य आहे. तें करण्यांत ज्यांना ज्यांना साहाय्य देतां येईल त्यांनीं प्रस्तुत लेखकाला असें साहाय्य द्यावें अशी नम्र विनंति आहे. किंवा या थोर कार्यासाठीं जर एखादें मंडळ स्थापन होईल व कोणी मान्यवर विद्वान् याकामीं पुढाकार घेतील तर तीहि एक स्वागतार्ह कल्पना ठरेल. ऑगस्टच्या २६ तारखेला विजापूरकरांचा जन्मदिवस येतो व १९६३ सालीं त्यांची शंभरावी जयंती येते.

---



अनुक्रमणिका

प्रा. नारायणशास्त्री द्रविड

# अनन्ताची अनन्तता

नवभारताच्या जानेवारी १९६०च्या अंकांत ' अनन्ताचा अंत ' या मथळ्याच्या एका लेखांत श्री. नी. र. वऱ्हाडपांडे यांनी अनन्ता- (Infinite) संबंधीच्या कांही समस्यांचा उलगडा करण्याचा प्रयत्न केला आहे. या समस्यांचें गांभीर्य लक्षांत घेतां या लेखांतील तत्संबंधी विवेचनाचा उथळपणा सुज्ञ वाचकांस जाणवल्याशिवाय राहणार नाहीं. लेखकानें आपल्या वरपांगी विचारपूर्ण अशा चर्चेद्वारें या लेखांत असा आभास उत्पन्न केला आहे कीं अनन्ताचा प्रश्न वाटतो तितका कठीण नाही. त्यांचें असें म्हणणें आहे कीं, भारतीय व पाश्चात्य अनिर्वाच्यवाद्यांनी आपल्या बुद्धीच्या कमकुवतपणामुळें ह्या प्रश्नाचा आजवर बाऊ केला आणि ज्या प्रखर बुद्धीच्या मदतीनें अलीकडच्या गणिती तत्त्वज्ञांनी हा प्रश्न सोडविण्यांत यश मिळविलें, त्या त्यांच्या बुद्धीलाच अनिर्वाच्यवाद्यांनीं सत्यान्वेषणास असमर्थ ठरवलें. यामुळें श्री. वऱ्हाडपांडे यांनी या सर्व अनिर्वाच्यवादी विचारकांस ' पलायनवादी ' व ' गूढ गुंजनवादी ' ठरवून टाकलें आहे.

लेखकानें ' अनिर्वाच्यवाद्यांचे ग्रंथ वाचले तरी आहेत काय ?

ज्यांनी भारतीय किंवा इतर अनिर्वाच्यवाद्यांचे ग्रंथ वाचले नाहींत त्यांचा वरील प्रकारचीं विधानें वाचून असा गैरसमज होण्याचा संभव आहे कीं हे अनिर्वाच्यवादी खरोखरीच मन्दबुद्धि असले पाहिजेत, कारण वऱ्हाडपांड्यांप्रमाणें अनन्ताचा प्रश्न चुटकीसरसा सोडवण्याऐवजीं बुद्धीला हें काम शक्यच नाहीं असा त्यांनी निर्वाळा देऊन टाकला आहे. पण अनिर्वाच्यवाद्यांसंबंधी कांही मत बनवण्यापूर्वी वाचकांनी कांही गोष्टी लक्षांत घ्यायला पाहिजेत. भारतीय अनिर्वाच्यवादी श्रीहर्ष–ज्याच्या खंडन-खंडखाद्य नांवाच्या ग्रंथाचा लेखकानें उल्लेख केला आहे.–हा एक हजार वर्षांपूर्वी झालेला असून त्याच्या ग्रंथाचें मोठमोठे विद्वान लोक आजहि फार काळजीपूर्वक अध्ययन करीत असतात. पण गेल्या हजार वर्षांतील भारतीय विद्वानांची परंपरा ही मूर्ख व भोळसर लोकांची परंपरा आहे. असें मानल्याशिवाय, या परंपरेतील विद्वानांच्या श्रीहर्षासारख्या ' पलायनवादी ' व ' गूढगुंजनवादी ' लेखकाविषयीच्या आदराची उपपत्ति लावतां येत नाही. फार खेदानें असें म्हणावें लागतें कीं आधुनिक गणिती तत्वज्ञांना श्रेष्ठ ठरविण्यासाठीं श्री. वऱ्हाडपांडे यांनी श्रीहर्षाचा ग्रंथ न वाचतांच त्याच्यावर 'पलायनवादा 'चा व ' गूढगुंजनवादा 'चा ठपका लावला आहे. वऱ्हाडपांडे अनिर्वाच्यवाद्यांच्या भूमिकेवर असा आक्षेप घेतात कीं, ' एकतर बुद्धीला आजपर्यंत एखादा प्रश्न सोडवतां आला नाहीं यावरून तो पुढें कधीच सोडवतां येणार नाहीं असें सिद्ध होत नाहीं. आतां श्रीहर्षाच्या खंडनखंडखाद्याच्या काशी येथे इ. स. १८८८ सालीं प्रसिद्ध झालेल्या आवृत्तीच्या ७६ व्या पानावरील उतारा पहा—

" यदपि ' निर्वक्तुमसामर्थ्ये गुरव उपास्यन्तां येभ्यो निरुक्तया शिक्ष्यन्ते– इत्युपालम्भवचनं तत्तदा शोभेत यदि मेयस्वभावाऽनुगामिनीयमनिर्वचनीयतेति न ब्रूयुः, वक्तृदोषादिति च वदेयुः । यस्तु वादी निरुक्त्यभिमानै धत्ते स निर्वक्तुं न तु शक्ष्यति, वक्तव्यदोषात्. "









अनुक्रमणिका

ज्यांना साधें संस्कृतहि कळत असेल त्यांना या उताऱ्यावरून स्पष्टपणें दिसून येईल कीं वऱ्हाडपांड्यांचा अनिर्वाच्यवादावरील आक्षेप श्रीहर्षानें डोळयाआड न करतां पूर्णपणें खोडून काढला आहे. ( या उताऱ्यापुढील परिच्छेदांत ) इतकेंच नव्हे तर आधुनिक गणिती तत्वज्ञां इतक्यांच निर्भीडपणें सर्व प्रकारच्या ' तार्किक विसंगतींना सरळ दंड थोपटून आव्हान देण्याचें ' ( वऱ्हाडपांड्यांचें विधान ) पूर्ण बौद्धिक सामर्थ्य श्रीहर्षास होतें ही गोष्ट वरील उताऱ्यावरील शंकरमिश्राच्या टीकेच्या या वाक्यावरून दिसून येतें – ' त्वमपि गुरुर्भूत्वा मां शिक्षय यदि पारयसि '

अशातऱ्हेनें श्रीहर्ष व त्यानंतरच्या मधुसूदन सरस्वती, चित्सुखाचार्य वगैरे भारतीय अनिर्वाच्य वाद्यांनी निर्वचनवाद्यांना चांगलें दंड थोपटून आव्हान देऊन त्यांना चारी मुंडे चीत केलें असतांना वऱ्हाडपांड्यांनीं त्यांना ' पलायनवादी ' म्हणून हिणवावें याचा अर्थ एकच होतो. तो हा कीं त्यांनी श्रीहर्षाचा काय किंवा इतर विद्वानांचा काय एकहि ग्रंथ वाचलेला नाहीं. त्यांना कसेंहि करून प्राचीन पंडितांना मूर्ख ठरवावयाचें आहे. पण सरळ सरळ ह्यांना मूर्ख म्हटल्यास वाचकांना बरें वाटणार नाहीं म्हणून वऱ्हाडपांड्यांनी वाचकांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन अनिर्वाच्यवाद्यावर पलायनवादाचा आरोप केला आहे.

## अनिर्वाच्यवाद्यांची भूमिका

जगाचें स्वरूप निर्वचनहि नाहीं या निष्कर्षापर्यंत येऊन पोंचण्यापूर्वी अनिर्वाच्यवाद्यांनी सर्व विचारांचें साधन जी बुद्धि तिच्या स्वरूपाची छाननी करून असें ठरवलें आहे कीं बुद्धीचें किंवा बुद्धिगम्य पदार्थाचें ( किंवा कल्पनेंचें ) स्वरूपच व्याघातमय आहे. सामान्य प्रश्न सोडवतांना बुद्धीचें व्याघाती स्वरूप जरी दिसून येत नाहीं तरी गति, स्थिति इत्यादि संबंधी मूलभूत प्रश्नांचा ऊहापोह करतांना बुद्धीचा अंतर्गत विरोध उघडकीस आल्याशिवाय रहात नाहीं. असें कां व्हावें असा प्रश्न यावर कोणी करूं शकतो. पण त्याचें पूर्णपणें समाधानकारक उत्तर देण्यासाठीं एक स्वतंत्र लेखच लिहावा लागेल. येथें ती चर्चा अप्रस्तुत असल्यानें अनिर्वाच्यवाद्यांचे सर्व युक्तिवाद गृहीत धरूनच पुढच्या मुद्याकडे आपल्याला वळणें भाग आहे.

## अनिर्वाच्यवादावरील एक आक्षेप

श्री. वऱ्हाडपांडे अनिर्वाच्यवाद्यांवर खोटे आरोप करूनच थांबलेले नाहींत तर एक पोरकट असा आक्षेपहि त्यांनी सृष्टीच्या अनिर्वाच्यतेविषयीं घेतला आहे. ते लिहितात, ' सृष्टि हा आभास असेल, भ्रम असेल, पण भ्रम तरी विसंगत का असावा ? सत्य जसें विसंगत असूं शकत नाहीं तसाच भ्रमहि विसंगत असूं शकत नाहीं. ' किती विचित्र विधान आहे हें ? म्हणे भ्रमांत विसंगति नाहीं ? मग सत्य व भ्रम यांच्यांत भेद कसा करणार ? वस्तूंचें दृश्य व सत्य स्वरूप यांच्यांतील विसंगतींतूनच भ्रम निर्माण होत असतो. आभास या रूपानें भ्रम खरा असेल पण त्या आभासांत दिसणारें वस्तुस्वरूपहि जर खरें असेल तर त्याचें ज्ञानहि खरेंच मानावें लागेल. वास्तविक पाहतां हा आक्षेपच विसंगत आहे. कारण सृष्टि आभासात्मक असल्यामुळें तिच्यांत विसंगति आहे असें अनिर्वाच्यवाद्यांचें म्हणणें नसून सृष्टि संबंधीच्या आपल्या कल्पना विसंगत असल्यामुळें आपल्याला दिसणारी ( किंवा कळणारी ) सृष्टिहि आभासात्मक असली पाहिजे असें त्यांचें मत असल्यामुळें वरील आक्षेप **Putting the cart before the horse** अशा स्वरूपाचा झालेला आहे.

अनन्ताच्या गणिती कल्पनेंतील तात्विक वैगुण्यें अनिर्वाच्यवादांवरील आक्षेपांचा पोकळपणा लक्षांत घेतल्यावर वऱ्हाडपांड्यांची अनन्ताच्या समस्येंसंबंधीचीं विधानेंहि कशीं चुकीचीं आहेत हें सहज

दिसून येईल. अनन्ताचे घटकहि अनन्त असतात ही कल्पना कदाचित गणितांतील एका परिभाषेच्या रूपानें स्वीकारतां येईल पण तात्विक दृष्ट्या ती सदोष आहे हें मान्य केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. या परिभाषेच्या समर्थनार्थ वऱ्हाडपांडे यांनी खालील उदाहरण दिलेलें आहे—

१, २, ३, ४. ... ... ... ... – I

२, ४, ६, ८. ... ... ... ... – II

या दोन्हीं ओळींची तुलना केल्यावर असें दिसून येतें की सम-विषम मिळून सर्व अंक जितके होतात तितकेच केवळ सम अंक होतात. जरा बारकाईनें विचार केल्यास हें विधान सपशेल चूक आहे असें दिसून येईल. अंकांची संख्या जर अनन्त—म्हणजे मोजण्याजोगी नाही तर ती इतकी आहे किंवा तितकी आहे असा शब्दप्रयोग योग्य आहे काय ? सम-विषम अंक मिळून जितके अंक होतात तितकेच सम अंक होतात हें सिद्ध करण्यासाठी वरील युक्तिवाद अपुरा आहे. त्या युक्तिवादावरून येवढेंच सिद्ध होतें कीं पहिल्या ओळीच्या प्रत्येक अंकाच्या दुप्पट असा दुसरा अंक असतो. पण जोपर्यंत या दोन्ही ओळीतील अंकांची बेरीज सारखी भरते हें सिद्ध होत नाहीं तोपर्यन्त वरील विधान असिद्धच राहतें. म्हणून वऱ्हाडपांड्यांनी हें सिद्ध करून दाखवलें पाहिजे की, अनन्त अंकांची बेरीज करतां येते व तसें त्यांना करतां आल्यास अनन्ताच्या मूलभूत कल्पनेलाच त्यांना मूठमाती द्यावी लागेल.

वरील आक्षेप हा तात्त्विक स्वरूपाचा आहे. त्यामुळें अनन्ताच्या गणिती कल्पनेच्या Hypothetical किंवा Operational स्वरूपाला बाध येत येत नाहीं. तत्त्वज्ञानांत अपेक्षिला जाणारा कांटेकोरपणा गणिताला आवश्यक नसतो. म्हणून वायरस्ट्रॅस कॅंटर वगैरे आधुनिक गणितज्ञांनी अनन्ताच्या कल्प... ष्टीकरण केलें आहे, तें गणिताच्या ...तीहि उपयोगी ठरलें तरी तात्विक प्रश्न सोडवण्यास त्याचा कांहीहि उपयोग होऊं शकत नाही हें ज्यानें या विषयासंबंधीच्या लिखाणाचा सखोल अभ्यास केला आहे त्याला जाणवल्याशिवाय राहणार नाही. बर्ट्रँड रसेलने ५७ वर्षापूर्वी आपल्या Principles of Mathematics या पुस्तकांत या विषयावर जीं अपरिपक्व मतें मांडलीं होतीं त्यांचाच वऱ्हाडपांड्यांनी आपल्या लेखांत पुनरुच्चार केला आहे. मध्यंतरीच्या काळांत या विषयावर मोठमोठ्या पाश्चात्य विद्वानांनी जे नवनवे विचार मांडले त्यांची बिलकुल दखल न घेतां एका जुनाट विचारसरणीला त्यांनी दुराग्रहानें चिकटून राहणें हें कोणाहि समंजस वाचकास सुज्ञपणाचें वाटणार नाहीं.

### फसवें तर्कशास्त्र

बेरजेनें न वाढणारी व वजाबाकीनें न घटणारी अशी ही अनन्त नांवाची संख्या कोणती अशी पृच्छा करणाऱ्या सामान्य वाचकास भोळसट ठरवण्यासाठी श्री. वऱ्हाडपांडे शून्याचें उदाहरण घेऊन असें म्हणतात कीं ज्याप्रमाणें शून्याला कोणत्याहि संख्येनें गुणिलें किंवा भागिलें असतां शून्यच उरतें, त्याचप्रमाणें अनंतांतहि बेरीज, वजाबाकी, गुणाकार इत्यादि प्रक्रियांनी कांहीं फरक न पडतां शेवटीं अनंतच शिल्लक राहतें. अनंताच्या या अनंततेच्या उपपत्तीला ते 'तर्ककर्कश विचार चातुरी' असें नांव देतात. पण येथें असें विचारावेसें वाटतें कीं खरोखरींच ही 'तर्ककर्कश विचार चातुरी' आहे कीं निव्वळ फसवेगिरी आहे ? 'बेरीज' म्हणजे संख्येमध्यें 'विशिष्ट प्रकारची वाढ करणारी प्रक्रिया' अशी साधी अंकगणिती परिभाषा स्वीकारल्यास वेक्टर्सची बेरीज करणें शक्य आहे काय ? वऱ्हाडपांड्यांना ही साधी गोष्ट माहित असायला हवी होती कीं उच्च गणितांमध्यें बेरीज, वजाबाकी वगैरे शब्दांना पारिभाषिक अर्थ दिलेले असतात. म्हणून, सरळ अर्थानें अनंताची बेरीज, वजाबाकी वगैरे शक्य नाही ही गोष्ट त्यांना कबूल करणें भाग आहे.

## एका कठिण समस्येचें बालिश उत्तर

अनंताच्या समस्येचें अनिर्वाच्यवाद्यांना उत्तर देतां आलें नाहीं असा निराधार आरोप करून शेवटी आरोपकर्ते स्वतः जें उत्तर देतात तें फारच मजेदार आहे. तें म्हणतात, "मोजण्याच्या क्रियेनें ½, ¼ वगैरे अंतरें संपवतां न आलीं तरी बाणाच्या गतीला तीं संपवतां येणार नाहींत असें त्यावरून सिद्ध होत नाहीं." गतिसंबंधी यवन तत्त्वज्ञ जीनो यानें असा आक्षेप घेतला होता कीं, अवकाश (Space) परमाणूंसारख्या अनन्त घटकांनीं बनलेला असेल तर कोणतीहि वस्तु– उदा० एक बाण– एका बिन्दूपासून निघून दुसऱ्या– त्याच्या अगदीं जवळच्या बिन्दूपर्यन्तहि जाऊन पोचूं शकत नाही. कारण या दोन बिन्दूंमध्यें देखील अनन्त बिन्दु असल्यानें एकेका बिन्दूच्या क्रमानें ही गति कोणत्याहि वस्तूला अत्यंत वेगवान् अशा देखील– संपवणें अशक्य आहे. या अडचणीवरच वऱ्हाडपांड्यांनी वरील तोड काढली आहे. त्यांच्या कथनाचें तात्पर्य असें आहे कीं, कोणत्याहि दोन बिन्दूंमधील अनन्त बिन्दूंची संख्या योजून संपवणे जरी अशक्य असलें तरी चलवस्तूला विशिष्ट कालावधींत ह्या अनन्त बिन्दूवरून जातां येणार नाहीं असें म्हणतां येत नाहीं. केवढें विद्वत्तापूर्ण उत्तर आहे. हें ! चल वस्तु एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं बरोबर जाऊन पोचते हें सारखें दिसत असल्यामुळेंच तर गतीच्या शक्यतेसंबंधी किंवा अवकाशाच्या रचनेसंबंधी हा प्रश्न उत्पन्न झाला आहे. अवकाश अनन्त घटकांनी बनलेला आहे असें मानल्यास दृश्य गतीची उपपत्ती देतां येत नाही म्हणून गतीत निव्वळ आभास आहे असें म्हणण्याची पाळी येते. वऱ्हाडपांडे गतीला आभास म्हणायला तयार नाहींत पण तिच्या शक्यतेची उपपत्ति देण्याची कांही गरज नाही असेंहि म्हणतात. या दोन्ही गोष्टी कशा साधाव्यात ! दोन बिन्दूमधील अनन्त बिन्दूंचें अन्तर तोडण्याचे दोनच मार्ग असूं शकतात. एक तर चलवस्तूनें एकेका बिन्दूवरून क्रमाक्रमानें जाऊन त्या अनन्त बिन्दूंचा शेवट गांठणें किंवा एकाच वेळीं चलवस्तूनें अनन्त बिन्दूवरून जाणें व अनन्त बिन्दूंचा मार्ग संपवणें. यांपैकीं पहिला प्रकार सदोष असल्यानें त्याच्याद्वारें गतीची उपपत्ति देतां येत नाहीं. पण दुसऱ्या प्रकारांत तसा कांही म्हणण्यासारखा दोष नाही. फक्त गति व स्थिति यांमधील आधुनिक गणिती तत्त्वज्ञांना मान्य नसलेला मूलभूत फरक ( वर सांगितलेला ) मान्य केला तर चल वस्तूला अनन्त बिन्दूंचें मार्गक्रमणहि अशक्य नाही असें दिसून येईल. पण श्री. वऱ्हाडपांडे आधुनिकांची कांस सोडायला तयार नाहींत व प्रामाणिकपणानें हेंहि कबूल करावयास तयार नाहींत कीं त्यांच्याच्यानें हा प्रश्न सुटण्यासारखा नाहीं. ज्या भारतीय नैयायिकांचा त्यांनी उल्लेख केलेला आहे त्यांचा हा प्रश्न सोडवण्याचा प्रकार– अनिर्वाच्यवाद वगळल्यास–सर्वोत्कृष्ट आहे. गति हें स्थितीहून वेगळें स्वतंत्र तत्त्व आहे असें कबूल केल्यानेंच गतिसंबंधी कोडें उलगडणें शक्य आहे हें नैयायिकांना माहित होतें असें त्यांच्या पदार्थांच्या वर्गीकरणावरूनच दिसून येतें. अनिर्वाच्यवादाची भूमिका नैयायिकांच्या भूमिकेपेक्षाहि मूलगामी आहे. त्या भूमिकेवरून या समस्येकडे पाहिल्यास 'गति दिसते पण ती कशी होते हें कांही सांगतां येत नाहीं' असा अनिर्वाच्यवादाशी जुळता निष्कर्षच काढावा लागतो. वऱ्हाडपांड्यांचा निष्कर्षहि याहून फारसा वेगळा नाही. फक्त वरील विधानाला तें येवढी पुस्ती जोडतील कीं, 'जरी गति कशी होते किंवा होऊं शकते हें आपणांला सांगतां आलें नाहीं तरी गति होतेच हें मानायला कांही हरकत नाहीं.

## काल सान्त की अनन्त

अनन्ताचा अन्त कसा होतो हें दाखवूनच लेखाच्या शेवटी श्री. वऱ्हाडपांडे काल सान्त किंवा अनन्त मानण्यास गणिताच्या दृष्टीनें कांही अडचण







नाहीं असें प्रतिपादन करतात हें त्यांचें म्हणणें अगदी बरोबर आहे. गणिताचा या प्रश्नाशी कांहीहि संबंध नाहीं. हा प्रश्न तत्त्वज्ञानाचा आहे म्हणून त्या संबंधीच्या तात्त्विक अडचणी हा प्रश्न सोडवण्याचा प्रामाणिक प्रयत्न करणाऱ्यानें अवश्य लक्षांत घ्यायला पाहिजेत. वऱ्हाडपांड्यांनी या अडचणींकडे थोडेंतरी लक्ष पुरविलें आहे असें त्यांच्या 'जगन्निर्मितीपूर्वी' या सदराखालील भोंगळ विवेचनावरून दिसून येत नाही. शिवाय त्यांनी 'अनन्त' या नांवाखाली 'अनादि पण सान्त' व 'सादि पण अनन्त' या दोन वेगवेगळ्या कल्पनांची गल्लतहि केली आहे.

काल सान्त आहे या मताच्या समर्थनार्थ श्री. वऱ्हाडपांडे म्हणतात कीं, 'कालाच्या निर्मितीच्या पूर्वी वर्षेंच नव्हतीं' या शब्दप्रयोगांत कोणताहि वदतो व्याघात नाही. पण हें विधान किती चुकीचें आहे हें सहज दाखवून देतां येईल. जग उत्पन्न होऊन इतकीं वर्षें लोटलीं असें जें आपण म्हणतों तें जग बदलत असून काळ स्थिर आहे असें गृहीत धरूनच. त्याशिवाय आतांपर्यंत लोटलेलीं जगाचीं वर्षें इतकीं असें आपल्याला म्हणतां येणार नाहीं. पण जगाप्रमाणेंच काळहि सादि मानला तर एक मोठी अडचण उत्पन्न होते. जग जेव्हां –म्हणजे ज्याकाळीं –उत्पन्न झालें त्याच काळीं तो काळहि उत्पन्न होणें अशक्य आहे. म्हणून जग ज्या काळांत उत्पन्न झालें तो काळ जगापूर्वीच उत्पन्न झाला असला पाहिजे. पण उत्पन्न होणें ही प्रक्रिया काळाशी अभिन्नपणें संबंधित असल्यामुळें जगाचा काळ जगापूर्वीचा व त्या काळाच्या उत्पत्तीचा काळ त्याच्याहि पूर्वीचा याप्रमाणें अनन्त काळांची परंपरा मानल्याशिवाय काळाच्या सान्ततेचें समर्थन करतां येत नाहीं. बरं, काळ अनन्त आहे असें म्हटलें तरी हा पेंच कांही सुटत नाही. कारण अनादि अनन्त अशा कालांत इतकीं वर्षें लोटलीं, इतकीं वर्षें लोटायचीं आहेत इत्यादि शब्दप्रयोगांत कांही अर्थच उरत नाही. इतरत्र ह्या प्रश्नाची विस्तृत चर्चा आलेली असल्यामुळें येथें फक्त तिचें दिग्दर्शन केलेलें आहे. आणि अनभिज्ञ वाचकांचा वऱ्हाडपांड्यांच्या चुकीच्या विवेचनानें गैरसमज होऊं नये हाच या चर्चेचा उद्देश.

अनन्ताची समस्या ही गणित व तत्त्वज्ञान या दोघांच्याहि दृष्टीनें सारख्याच महत्त्वाची अशी समस्या आहे. हिचें स्पष्टीकरण व उत्तर एका लेखाच्या मर्यादेत अशक्य आहे. त्यासाठी एक मोठा ग्रंथ लिहिला पाहिजे, म्हणून या लेखांतील विवेचनहि समर्पक किंवा समाधानकारक आहे असें लेखकाला वाटत नाहीं. तरी पण प्राचीनकाळच्या विद्वान् ग्रंथकारांवर उठल्या सुठल्या वाटेल तो आरोप करण्याची अलीकडील कांहीं लेखकांची प्रवृत्ति किती कुत्सितपणाची आहे ही गोष्ट समंजस वाचकांच्या निदर्शनास आणून देणें हाच या लेखाचा मुख्य उद्देश असल्यामुळें, अनन्ताच्या समस्येचा पूर्ण उलगडा जरी या लेखाच्या द्वारें झाला नाहीं तरी कांही बिघडत नाहीं.

शेवटीं वऱ्हाडपांड्यांसारख्या लेखकांस * १२०० वर्षांपूर्वी झालेल्या महान् भारतीय विचारक वाचस्पतिमिश्र यांच्या शब्दांत अशी विनंति करावीशी वाटते –

'अभ्यर्थये वितथवाङ्मयपांसुवर्षैः
मा माऽऽविलीकुरुत कीर्तिनदीः परेषाम्.'

---

* श्रीहर्षाप्रमाणें बर्गसांचीहि वऱ्हाडपांडे यांनी आपल्या लेखांत हेटाळणी केली आहे. पण बर्गसांच्या कोणत्याहि पुस्तकाचा किंवा त्यातील विधानांचा त्यांनी उल्लेख केलेला नसल्यामुळें नुसतें बर्गसांचें नांव ऐकूनच त्यावर त्यांनी लेखांतील आक्षेप केले असावेत.

## पुस्तक-परामर्श –

**निळासांवळा**– ले. जी. ए. कुलकर्णी, प्रकाशक: पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७.

आपल्या लेखनानें अल्पावधींतच रसिक-वाचकांच्या व टीकाकारांच्या मनांत मोठ्या अपेक्षा निर्माण करण्याचें श्रेय श्री. जी. ए. कुलकर्णी यांनीं संपादन केलें आहे. जीवनांतल्या विविधांगांशीं लेखक समरस होत असल्यामुळें अनेक ठिकाणीं कथाविषयांत विविधतेचा व नावीन्याचा प्रत्यय येतोच परंतु अतिशय संवेदनशीलतेमुळें लेखकाच्या अंतःकरणांत अनुभूतीचीं विविध वलयें निर्माण होतात व त्यांच्या कल्पक व्यक्तित्वामुळें सौंदर्यरूप धारण करून तीं जेव्हां व्यक्त होतात तेव्हां कुलकर्णी यांच्या कथेचें स्वतंत्र तेज विशेषत्वानें नजरेंत भरतें. कथाविषयांशीं लेखक उत्कटतेनें तन्मय होत असल्यामुळें अनुभूतींत जिवंतपणाची धग निर्माण होते व रसिक वाचकाला प्रत्ययाचा आस्वाद देते. मनांत उमटलेल्या चित्रविचित्र, अधिऱ्या भावच्छटांतील कथारूप व्यक्त करण्याची लेखकाची प्रयोगशील धडपड लेखनाला पृथगात्मता धारण करून देते.

चन्द्रावळ व सांगाडा या कथांतील कथावस्तु ठाशीव अंगाच्या असल्यामुळें व त्यांच्या केन्द्रस्थानी असलेल्या व्यक्तिरेखांच्या भावजीवनांतून त्यांना पीळ निर्माण होत असल्यामुळें या कथा वेधक ठरतात; तितक्याच जीवनस्पर्शी ठरतात. सण्याच्या जीवनांत गौरी वंचना करून जाते, चंद्रावळ चुटपुट लावून जाते. शेवटीं त्याला सांपडलेलें दिमाखदार कबूतर– चंद्रावळ– त्याच्या जीवनांत आनंद निर्माण करतां करतां आकाशांतल्या आकाशांत शिकाऱ्याकडून हिरावली जाते. सण्याच्या अंतःकरणांतील प्रेमभंगाच्या धाग्याशीं या चंद्रावळीचा धागा गुंफला जातो. आकाशांत हरपलेल्या चंद्रावळीच्या कथाभागानें पूर्वीचा प्रेमभंगाचा धागा पुन्हां एकदां उजळून निघतो. माथ्यावरल्या कबूतराकडे पाहत अरीप्रमाणें अंगाभोवतीं फिरणारा दुर्दैवी सण्या व जिवाला हुरहुर लावीत मंडलें घेत उंच भिरभिरणारें कबूतर यांचा एक भव्य भोंवराच तयार होऊन त्या गतीची धुंदी वाचकाला चढवीत फिरत राहतो. सांगाडा कथेंतहि नाडगौडा मास्तरांची करुण कहाणी मन हालवून टाकणारी आहे. मानवाला कधींहि थोपवता न येणारा काळ, कठोर वास्तव जग व या दोन्हींशीं टक्कर देतांना, स्वतःच्या विशिष्ट स्वभावाचें लोढणें गळ्यांत गुंतवलेला माणूस कसा हतबल होतो याचें प्रत्ययकारी दर्शन या कथेंत घडतें. 'गुंतवळ,' 'हिरवी मखमल गोरा हात', 'मुखवटा' या कथांना चिरेबंदी कथावस्तु अशी नाहीं. माळावरल्या, मुंबईमधल्या व खेड्यांतल्या वातावरणांतील जीवनखंडाचीं हीं चित्रणें आहेत. स्वभाव कथाहोऊं शकतील असे अनेक जीवनधागे एकमेकांत गुंफून त्या सर्वांची एक आकृति निर्माण करण्याचा प्रयत्न या ठिकाणी आढळतो. वास्तव जीवनाचा लेखकाच्या व्यक्तित्वाशी संघर्ष व संयोग होऊन त्याला कलास्वरूप प्राप्त होतें. चित्रविचित्र रंगाकृतींचे फरशांचे तुकडे टाकून फरसबंद लादी तयार व्हावी त्याप्रमाणें जिवंतपणानें स्पंदन करणाऱ्या चित्रविचित्र प्रतिमाच्या गुंफणींतून या कथांचें सौंदर्य निर्माण होतें. आशयघटकांचें एक वातावरण निर्माण होतें. अशा प्रकारचें एक विशिष्ट वातावरण निर्माण होणें हें अशा कांहीं कथांचें प्राणतत्त्वच ठरतें. तेंच त्या कथेंतलें व्यक्तित्व असतें. 'पडदा' या कथेंत तें प्रिन्सिपॉल ठकारांच्या जीवनाचें एक अंग बनतें. त्यामुळेंच रंगसंगति बिघडवणारा पडदा मनांत विविध आंदोलनें निर्माण करतो. रंगसंगति बिघडवणारा पडदा बायकोनें आणल्यानें मनाला झालेली जखम वाचकाला जाणवावी व पडद्याच्या फडफडण्याबरोबर मनांत ठसठसावी इतक्या कुशलपणें खोलींतील रंगसंगति व धुंद वातावरण जिवंत केलें जातें. प्रयोग म्हणून व एक नवी झेप म्हणून या कथा उल्लेखनीय ठरतील. परंतु कथा-प्रकार म्हणून विचार करतांना एक गोष्ट सांगता येईल ती म्हणजे विशिष्ट वातावरणाचें वा निसर्गाचें चित्रण म्हणजे कथा या प्रकारचा मजकूर शैलीच्या सामर्थ्यामुळें व रुचिपालट घडल्यामुळें वाचनीय वाटला व हातास हात लावण्याच्या व्यावहारिक सोयीमुळें कथा म्हणून मान्यता पावला तरी अशी चित्रणें म्हणजे कथा प्रकाराचें स्वगृह व बलस्थान नव्हत हें दृष्टीआड करता येणार नाहीं. मुखवटा, गुंतवळ या कथांना कथेचें नुसतें चाटण लावलें जातें. त्यांना वेधकता येते ती लेखकाच्या शैलीमुळें, तिच्यांतील सौंदर्यदर्शक घटकांमुळें –'गुंतवळ,' हिरवी मखमल गोरा हात', अशा कांहीं कथा वाचतांना अन्यत्र आढळलेल्या परिचित लकबांचें स्मरण होत राहतें परंतु तें दोष-

स्वरूप ठरत नाहीं; कुलकर्णी यांच्या शैलीचें स्वतंत्रपण हिरावून घेणारें तर मुळींच नाहीं.

'राणी', वासंती, अवशेष, सूड, डाग या छोट्या कथांच्या मूळाशीं नाट्यपूर्ण आशय आहे, व तो सूचकतेनें व्यक्त झाला आहे. छोट्या राणीच्या वास्तव्याचा भास मनांत जाणवत असतो व राणी गेल्याच्या कल्पनेनें त्याला संक्षेप बसत असतो. या ओढाताणींत व भाऊंच्या बधीर मनःस्थितींत चटका लावणारें कारुण्य आहे. 'वासंती' विषयींहि हेंच म्हणतां येईल. या कथाविषयांत नावीन्य नाहीं परंतु त्यांना प्राप्त करवून दिलेला आकार लक्षणीय वाटतो. सूड आणि डाग या कथा सूचकतेनें संपवल्या जातात. त्यांचा मनावर होणारा आघात एवढा परिणामकारक होतो कीं कथा संपते तरी गतिमान झालेला आशय इच्छित कक्षेपर्यंत आपोआप जाऊन पोचतो.

श्री. कुलकर्णी यांच्या कथा तपशीलानें गच्च भरलेल्या असतात. या तपशीलाचा कण न् कण भावनेनें सजीव करण्याची व त्याच्या प्रत्यक्ष रूपाला मुरड घालून कल्पकतेनें त्या कणांना सौंदर्याचे चमचमते तास पाडण्याची त्यांची सारखी धडपड चाललेली असते. लेखकाच्या शैलीचें हें सामर्थ्य पाहावयाचें असेल तर 'अंधाराचीं पावलें" ही भावकथा जरूर बघावी. सूर्य मावळतां मावळतां अंधाराच्या आहारीं चाललेल्या विश्वाचें रंग-रूप पळापळाला पालटतें. एकेका क्षणाचा आधार विरूं लागतांच त्यावर आधारलेली रंगच्छटांची दुनिया आकार बदलत कोसळते. याच रंगरेखांशीं हळव्या मनांतील भावांचें नातें असल्यानें त्यांना विविधरंगी उमाळे येतात ते व्यक्तविण्याची व एकाच वेळीं जाणवणाऱ्या अनेक दृश्यांच्या त्या त्या छटांची माळ एकाच वाक्यांत गुंफण्याचा प्रयत्न कुलकर्णी कसा करतात तें वरील भावकथेंत दिसेल. परंतु याच पद्धतीनें कथांत तपशील ठासून भरतांना त्याच तपशिलाचें गचपण निर्माण होऊन कांहीं ठिकाणीं कथेचा सरळ मार्ग तो आडवून बसतो. कांही ठिकाणी तपशील कथेला बाहेरून टांचल्यासारखा वाटतो. कांही ठिकाणीं कथेच्या परीघाबाहेर सांडून वाया ठरतो. 'गुंतवळ' ही कथा शेवटीं कंटाळवाणी बनूं लागते याचें कारण यांत शोधतां येईल. याचप्रकारें तपशील भरण्याचा व प्रतिमा योजून त्याला मुरड घालण्याचा यत्न केल्यानें कुलकर्णी कथेंतली सहजता एवढ्या प्रमाणांत गमावून बसतात वाक्यें अनेकदां वाचूनहि अर्थाचा घोट गळ्यांत उतरत नाहीं. (उदा: पडदा). कथेंतल्या वाक्यावाक्याला उपमाउत्प्रेक्षांचा खच पाडल्यानें कृत्रिमता निर्माण होते. भरपूर चारोळ्या घातलेलें मसाल्याचें दूध सरळ पितांहि येत नाहीं व निव्वळ चावतांहि येत नाहीं, हाच प्रकार या शैलीनें निर्माण होतो. अनेकदां या प्रतिमा अशा असतात कीं अर्थाचें दार नुसतें किलकिलेंहि होत नाहीं. ज्या घटकांमुळें कुलकर्णी यांची कथा पृथगात्म होते तेच घटक तिच्यांत दोष निर्माण करायला कारणीभूत होतात हें विरोधपूर्ण वाटलें तरी खरें आहे.

मराठी लघुकथेचें वैभव श्री. कुलकर्णी यांनीं अनेक रीतींनीं वाढवलें आहे यांत शंका नाहीं. सरकारी परीक्षकांनीं निळासावळास पहिलें पारितोषिक देऊन त्यांचा जो गौरव केला आहे तो यथोचित असाच आहे. याबद्दल जी. ए. कुलकर्णी यांचें मनःपूर्वक अभिनंदन व गुणग्राहकतेबद्दल समीक्षकांना धन्यवाद.

—शंकर. वि. वैद्य

---



अनुक्रमणिका

[अनुक्रमणिका](#)








Regd. No. B. 5177



उद्योगधंद्यांना पाचारण

# महाराष्ट्र

उद्योगधंद्यांनीं गजबजलेलें राज्य

लहान-मोठ्या सर्व प्रकारच्या उद्योगधंद्यांना

निमंत्रण

महाराष्ट्र म्हणजे भारतामधील उद्योगधंद्याचे

माहेर घरच







हे उद्योगधंदे राष्ट्राच्या संपत्तींत व सामर्थ्यांत
भर घालतील

**महाराष्ट्राचें व भारताचें औद्योगीकरण करा**
**आणि राष्ट्राला बलशाली व समृद्ध करा**

प्रकाशन संचालक, महाराष्ट्र सरकार, मुंबई.



अनुक्रमणिका